


# नवभारत

वर्ष ४ थें ]   ऑक्टोबर १९५०   [ अंक १ ला

५८०५



किंमत १ रुपया












महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
**संकेतस्थळ :** rmvs.marathi.gov.in **इ-टपाल :** rmvsmumbai@gmail.com; rmvs_mumbai@yahoo.com




# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे.

ह्या प्रकल्पांतर्गत उपलब्ध होणारे ग्रंथ व नियतकालिके प्रतिमुद्राधिकार अधिनियमाची मुदत उलटलेले असल्याने सार्वजनिक स्वरूपात उपलब्ध आहेत. ही सामग्री विविध ग्रंथालयांनी जतन करून ठेवल्यामुळेच आज आपल्याला उपलब्ध होत आहे.

सदर पुस्तके अथवा नियतकालिके जशी उपलब्ध होत जातील तसे त्यांचे संगणकीकरण करून जनतेला ती उपलब्ध करून देण्यात येतील. ह्या ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना आपण खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१) सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती ह्या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२) सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रकम आकारता येणार नाही.
३) पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्थेची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४) आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी ह्या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून ह्या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. ह्यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था ह्यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका








# नवभारत



## या अंकांतील जाहिराती








# जाहिरातींचे दर

| | सबंध पान | अर्धे पान | पाव पान |
|---|---|---|---|
| एक वेळ | ७५ | ५० | ३५ |
| तीन वेळां | ७० प्रत्येक खेपेस | ४५ प्रत्येक खेपेस | ३० प्रत्येक खेपेस |
| सहा वेळां | ६५ ,, | ४० ,, | २५ ,, |
| बारा वेळां | ६० ,, | ३५ ,, | २० ,, |

पाव पानापेक्षां कमी जाहिरात स्वीकारली जात नाहीं.

| | | |
|---|---|---|
| कव्हर पान नं. ४ | प्रत्येक वेळेस | ५० रुपये |
| कव्हर पान नं. २ व ३ | ,, ,, | २० रुपये |

(१) सर्व जाहिराती 'जाहिराती व जाहिरातदार' या सदरांत छापल्या जातात.

(२) शक्य असेल त्या वेळेस ज़ाहिरातदारांचा थोडक्यांत परिचय देण्याची पद्धत स्वीकारलेली आहे.

(३) एका पानांत दोन कॉलम्स असतात.

(४) पानाचा आकार ८॥" × ५।"

व्यवस्थापक
**'नवभारत'**
२९१ शनिवार, पुणें २

# वर्गणीदारांस सूचना

(१) 'नवभारत'चा अंक दरमहा १ तारखेच्या आंत नियमितपणें काळजीपूर्वक पोस्टांत टाकला जातो. वर्गणीदारांस जर आपला अंक ५ तारखेपर्यंत मिळाला नाहीं तर त्यांनीं प्रथम स्थानिक पोस्ट ऑफिसांत चौकशी करून नंतर आमचेकडे लिहावें. अंक शिल्लक असला तरच पाठविला जाईल. अंक न मिळाल्याबद्दल १० तारखेनंतर येणाऱ्या तक्रारीस उत्तर दिलें जाणार नाहीं.

(२) वर्गणीदार कोणत्याहि महिन्यापासून होतां येतें.

(३) पत्रव्यवहार करतांना नेहमीं अनुक्रम-नंबर अवश्य लिहावा. 'नवभारत' कचेरींतून दरमहा जो अंक रवाना होतो त्यावर पत्त्याच्या वरच्या बाजूस डाव्या हाताला अनुक्रम-नंबर लिहिलेला असतो.

(४) पत्ता बदलावयाचा असल्यास त्याबद्दलची सूचना कचेरीस २५ तारखे-पूर्वी मिळाली पाहिजे. त्यानंतर सूचना-पत्र आल्यास त्याची अंमलबजावणी त्याच महिन्यांत न होतां पुढील महिन्यापासून केली जाईल.

(५) 'नवभारत' च्या कोणत्याहि एजंटास वर्गणी वसूल करण्याचा अधिकार नाहीं. त्यामुळें कचेरी व वर्गणीदार या दोघांनाहि त्रास होतो व विलंब लागतो. म्हणून वर्गणी नेहमीं कचेरीकडे खालील पत्त्यावर पाठविण्याची कृपा करावी.

व्यवस्थापक
**'नवभारत',**
टिळक रोड, पुणें २

अनुक्रमणिका

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष चौथें
अंक पहिला

# नवभारत

ऑक्टोबर
१९५०

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत – श्री. हरि कृष्ण मोहनी – प्रा. वि. म. बेडेकर
का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक र. ग. जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून
सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.






# ' नवभारत ', ऑक्टोबर १९५०

## लेखक-परिचय

श्री. वा. ल. चिपळुणकर—( पुणें ) थिऑसफिकल सोसायटीचे कार्यकर्ते व मराठी थिऑसफिकल फेडरेशनचे चिटणीस.

श्री. माधवराव बागल—कोल्हापूर येथील प्रसिद्ध कार्यकर्ते. साहित्य आणि चित्रकला यांचे व्यासंगी.

प्रा. ग. ना. जोशी—नवसारी येथील गार्दा कॉलेजमध्यें तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक.

श्री. केदारनाथ ( मुंबई )—' सर्वोदय 'निष्ठ तत्त्वचिंतक आणि कार्यकर्ते. म. गांधींचे सहकारी.

श्री. बा. ना. जठार—अमळनेर येथील प्रताप हायस्कूलमध्यें शिक्षक. खानदेश माध्यमिक शिक्षक-संघाचे अध्यक्ष.

श्री. ना. ग. जोशी एम्. ए. —( बडोदें )–'जीवनयोग ', ' पैगंबराचा बगीचा ', ' विश्वमानव ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

श्री. वा. मु. लिमये एम्. ए. एलूएल्. एम्. —( मुंबई )–घटनाशास्त्र, घटनाकायदा, समाजशास्त्र या विषयांचे व्यासंगी.

प्रा. य. द. भावे—बेळगांवच्या लिंगराज कॉलेजमध्यें इंग्रजीचे प्राध्यापक. ' आर्द्रा ' या प्रकाशित आणि ' हळवें भिंग ' या आगामी, कवितासंग्रहांचे लेखक.

श्री. पुरुषोत्तम पाटील—पुणें विश्वविद्यालयांत बी. ए. चे विद्यार्थी. यांच्या कविता मराठी नियतकालिकांतून प्रसिद्ध होत असतात.

श्री. कुवलयानंद—( लोणावळा )—' कैवल्यधाम ' या सुविख्यात योगशास्त्रीय संशोधनसंस्थेचे व यौगिक आरोग्यकेंद्राचे संस्थापक व संचालक. याच संस्थेतर्फे ऑक्टोबर-पासून सुरू होणाऱ्या ' कॉलेज ऑफ योग ' या संस्थेचे प्रमुख.

सौ. संजीवनी मराठे बी. ए —( खानापूर )—' संजीवनी ', ' राका ', ' संसार ', ' छाया ' या काव्यसंग्रहांच्या लेखिका.

श्री. बा. रं. सुंठणकर बी. एजी. —( बेळगांव )–' महाराष्ट्र–संतमंडळाचें ऐतिहासिक कार्य ' या पुस्तकाचे लेखक.

श्री. स. शं. देसाई—( पुणें )—' टॉलस्टॉयच्या स्मृती ' या पुस्तकाचे लेखक.

श्री. त्रि. गो. इंगोलीकर ( नागपूर )—साहित्य आणि तत्त्वज्ञान यांचे व्यासंगी. भारतीय ' गूढवाद ' या पुस्तकाचे लेखक.

श्री. पंढरीनाथ रेगे—उपसंपादक ' लोकसत्ता ', मुंबई.

---

अनुक्रमणिका






श्री. वा. ल. चिपळुणकर

# साधनशुचिता

आचार्य भागवत, व महात्मा गांधी यांचे इतर अनुयायी, यांनीं गेल्या वर्षी पुणें येथील वसंत-व्याख्यानमालेंत व इतर ठिकाणीं 'गीता-रहस्या'चा उल्लेख करून असें प्रतिपादन केलें कीं, लोकमान्य टिळकांनीं लोकसंग्रहाचें उच्च ध्येय प्रतिपादन केलें खरें, पण त्यांत साधनशुद्धतेकडे कटाक्ष ठेवला नाहीं. त्यामुळें उच्च ध्येयासाठीं वाटेल त्या मार्गाचा अवलंब करावा असा निष्कर्ष निघतो. गांधीजींनीं साधनशुचितेवर जोर देऊन, 'गीतारहस्या'पुढें एक पाऊल टाकलें.

यानंतर लो. टिळकांच्या 'गीतारहस्या'ची सहावी आवृत्ति प्रसिद्ध झाली. 'पुस्तकपरीक्षण' या सदराखालीं, 'केसरी'च्या दिनांक १६ मे १९५० या मंगळवारच्या अंकांत, श्री. ज. स. करंदीकर यांनीं या नवीन आवृत्तीचें परीक्षण करून, गांधीजींच्या उपर्युक्त अनुयायांचें खंडन करण्याकरितां "'सिद्धावस्था व व्यवहार' प्रकरण पुन्हां एकदां वाचा" या मथळ्याखालीं एक सुंदर व विस्तीर्ण लेख लिहिला. त्यानंतर सहाच दिवसांनीं म्हणजे सोमवार ता. २२ मे रोजीं मुंबईचे सुप्रसिद्ध प्राध्यापक, लेखक व वक्ते रा. न. र. फाटक, यांनीं "साधनशुचिता" हाच विषय घेऊन, यंदाच्या वसंतव्याख्यानमालेंत व्याख्यान दिलें. अध्यक्ष तात्यासाहेब करंदीकरच होते. याप्रमाणें 'गीतारहस्य' प्रसिद्ध झाल्यापासून पस्तीस वर्षांनीं हाच विषय, मागें अनेक वेळां चर्चिला गेला असतांना सुद्धां, गांधींच्या अनुयायांचे आक्षेप व 'रहस्या'ची निघालेली नवीन आवृत्ति, या प्रसंगांमुळें जनतेपुढें पुन्हां चर्चेला आला. आम्हींहि या प्रसंगाचा फायदा घेऊन, श्री. तात्यासाहेब करंदीकरांचा लेख, प्रा. फाटकांचें भाषण व प्रत्यक्ष 'गीतारहस्य', या त्रयीविषयीं कांहीं अंशीं निराळ्या व स्वतंत्र दृष्टीनें विचार मांडण्याचें योजिलें आहे.

प्रथम प्रा. फाटक यांच्या भाषणाचा विचार करूं. त्यांनीं आपल्या भाषणांत सदरहू विषयाचा विचार सामान्य व्यवहार, कायदा, समाजशास्त्र, नीतिशास्त्र व राजकारण या विविध दृष्टींनीं मांडला; पण आरंभापासून अखेरपर्यंत त्यांच्या भाषणांत राजकारणाचाच सूर मुख्य होता व ते तसा उल्लेख मधूनमधून करीतहि होते. तत्त्वज्ञानाचा असा भाग थोडा होता.

## 'साधना'चा उथळ व संकुचित अर्थ

त्यांनीं आपल्या भाषणांत दोन मुद्दे मुख्यत्वें मांडले. त्यांचा पहिला मुद्दा असा : "राजकारणांत गांधींनीं 'सत्य-अहिंसा' हा दंडक घालून चळवळी केल्या. त्यांनीं ज्या निग्रहानें हा दंडक स्वतः पाळला तो निग्रह महापुरुषाला साजेसा होता. भोंवतालीं सर्वत्र हिंसा चालू असतांना गांधींनीं अहिंसेवरील निष्ठा सोडली नाहीं, हें त्यांचें अद्वितीयत्व होय. पण त्यांच्या दोन तत्त्वांचा गैरफायदा घेऊन दांभिकपणानें मिरवणाऱ्या त्यांच्या अनुयायांच्या विरुद्ध माझा आक्षेप आहे. आपल्या अनुयायांचा हा दांभिकपणा स्वतः गांधीजींनीं सन १९४६–४७ सालीं अनेक वेळां प्रकट केला आहे. गांधींचीं तत्त्वें अंगावर येऊं लागलीं म्हणजे मग, त्यांतून पळवाट काढण्याकडे यांची प्रवृत्ति असते. तेव्हां, साधनशुचितेसारख्या विषयाबद्दल 'गीतारहस्या'वर आक्षेप घेण्याचा यांना काय अधिकार आहे?"








प्रा. फाटकांचा हा आक्षेप वस्तुस्थितीप्रमाणें शब्दशः खरा आहे हें कोणीहि कबूल करील. पण हें उत्तर, कोर्टांत दिल्या जाणाऱ्या Pari Delicto (equally guilty) या वकिली थाटाचें आहे. आक्षेपावर प्रत्याक्षेप घेणें म्हणजे स्वतःच्या भूमिकेचें समर्थन नव्हे. या योगें लो. टिळकांचा साधनशुचितेवर कटाक्ष होता कीं नव्हता हा प्रश्न कसा सुटेल ? या दृष्टीनें आक्षेप–प्रत्याक्षेप हा प्रकार तात्त्विक चर्चेत निरर्थक आहे. प्रा. फाटक यांचा दुसरा मुद्दा असा : "साधनांना स्वतंत्र, स्वयंसिद्ध अस्तित्वच नाहीं. त्यामुळें तीं शुचि वा अशुचि आहेत हें म्हणणें बरोबर नाहीं." याचें स्पष्टीकरण करतांना त्यांनीं सामान्य व्यवहारांतील म्हणून तीन उदाहरणें घेतलीं :(१) विंचू मारण्याचा हेतु ठरल्यानंतर त्याला मारण्याकरितां साधन म्हणून घेतलेला जोडा धडका वा फाटका, जुना अगर नवा हा, स्वतंत्रतः शुचीहि नाहीं, व अशुचीहि नाहीं. (२) उत्तम पीक येण्याकरितां सोनखत घातलें, तर उत्तम पीक येण्याकरितां साधन म्हणून त्याला कोणी अशुचि म्हणत नाहीं. तसेंच (३) खून करणाराच्या हातांतील तरवार किंवा पिस्तूल हीं शुचि किंवा अशुचि कोणी म्हणत नाहीं.

आतां साधनशुचितेचा प्रश्न तात्त्विक दृष्टीनें जेव्हां चर्चिला जातो, व जेव्हां तो 'गीतारहस्यां'तहि चर्चिला गेला आहे त्या वेळीं कर्त्याच्या अंतःकरणांतील प्रेरकबुद्धि, ध्येय अगर हेतु, हें साध्य समजून ध्येय साध्य करण्याकरितां, सत्य–असत्य, हिंसा-अहिंसा, स्तेय–अस्तेय, वगैरे ज्या आचरणाचा तो अवलंब करतो, तें साधन समजलें जातें, व याच साधनाच्या शुचि-अशुचि स्वरूपावरून, साधनशुचितेचा विचार करण्यांत येतो. वरील आचरण करतांना सत्यासत्य आचरण लेखीं का तोंडीं होतें, लेख पातळ कागदावर कीं जाड कागदावर लिहिला, हिंसा पिस्तुलानें झाली कीं तरवारीनें झाली, या निर्जीव वस्तू, ज्या साधनांचीं साधनें होत, त्यांचा विचार तात्त्विक चर्चेत येत नाहीं. फक्त हेतु साध्य करण्याकरितां वर लिहिल्याप्रमाणें कर्त्यानें सत्य–असत्य, हिंसा–अहिंसा स्तेय–अस्तेय वगैरे कोणत्या आचरणाचा साधन म्हणून अवलंब केला एवढाच विचार येतो. या दृष्टीनें सत्य, अहिंसा, अस्तेय वगैरे हीं साधनें स्वयंसिद्ध व नित्य शुचिस्वरूपाचींच आहेत व असत्य, हिंसा व स्तेय हीं कायमचीं अशुचिस्वरूपाचीं आहेत. प्रा. फाटकांनीं वरील निर्जीव वस्तूंचा साधन म्हणून उल्लेख केल्यामुळें अध्यक्षांना यासंबंधीं 'हा अर्थ संकुचित' म्हणून आपल्या भाषणांत शेवटीं स्पष्टीकरण करावें लागलें; नाहीं तर प्रा. फाटकांच्या विचाराप्रमाणें विंचू मारण्याकरितां घेतलेल्या जोड्यावरच न थांबतां, जोडा मारण्याची क्रिया (चेष्टा), तो मारण्याची हातांतील शक्ति (करण=इंद्रिय) व तो हात ज्याचा अवयव आहे तें शरीर (अधिष्ठान) यांचाहि साधनांत विचार करावा लागेल (गीता १८·१४). पण तात्त्विक चर्चेत तो अभिप्रेत धरला जात नाहीं. पण हाच मुद्दा फिरून पुढें दुसऱ्या दृष्टीनें येणार असल्यामुळें हा विषय येथेंच थांबवितों.

यापुढें प्रा. फाटकांनीं अखेरीस म्हटलें कीं, कार्याकार्यविचारांत, साधनांच्या शुचि-अशुचि स्वरूपाचा विचार येत नसून, कर्त्याच्या अंतःकरणांतील बुद्धि अगर हेतु यांच्याच शुद्धाशुद्ध स्वरूपाचा विचार येतो असें गीतारहस्यांत सांगितलें आहे, तेंच खरें आहे. येथून पुढची चर्चा रा. तात्यासाहेब करंदीकर व प्रा. फाटक यांच्या विधानांच्या दृष्टीनें एकत्रच होण्यासारखी असल्यामुळें ती तशी यापुढें केली आहे.

### "सत्य व अहिंसा स्थितप्रज्ञांचे स्वभावधर्मच"

कर्त्याच्या अंतःकरणांतील प्रेरक बुद्धि अगर हेतु हें साध्य होय. तें शुद्ध असलें पाहिजे याबद्दल लो. टिळक व म. गांधी यांचें पूर्णतः एकमत होतें. पण हें साध्य साधण्याकरितां साधन कसें असावें, याबद्दल मात्र मतभेद होता. म. गांधींचें म्हणणें कीं, "परिस्थिति कशीहि असली तरी साधन हें शुद्धच असलें पाहिजे, त्यांत कोणतीहि तडजोड करणें इष्ट नाहीं. 'The end does not justify the means' (शुद्ध) हेतु, (अशुद्ध) साधनांना न्याय्य करूं शकत नाहीं." यावर लो. टिळकांचें म्हणणें असें कीं, हें तत्त्व त्यांस कबूल नाहीं. आपलें म्हणणें मांडतांना ते मानवाचे दोन वर्ग करितात. एक स्थितप्रज्ञांचा व दुसरा सामान्य जनांचा. स्थितप्रज्ञांचें, वास्तव-

सृष्टींत कधीं काळीं अस्तित्व होतें हें गांधींना कबूल नाहीं. पण आदर्श म्हणून मानून त्या वर्णनाप्रमाणें प्रत्येकानें आपला प्रयत्न करीत राहावें असें ते म्हणत. आतां स्थितप्रज्ञ माणसें झालींच नसतील तर त्यांच्या विषयींचा प्रश्नच संपला. पण तशीं माणसें होतीं यावर लो. टिळकांचा विश्वास होता व म्हणूनच त्यांनीं 'सिद्धावस्था व व्यवहार' हें प्रकरण 'गीतारहस्यां'त लिहिलें. ते म्हणतात : "स्थितप्रज्ञाला सर्व दुष्कृत्यें करण्याची मुभा आहे असा वरील सिद्धान्ताचा कांहींजण विपर्यास करीत असतात' (गी. र.[1] पान ३६९) फिरुन अ. १८ श्लोक १७ वरील टीकेंत पान ८३५ वर ते म्हणतात : "तथापि ज्याची फलाशा सुटली त्यानें वाटेल तें कुकर्म करावें असाहि सतराव्या श्लोकाचा अर्थ समजावयाचा नाहीं". यावरून उच्च ध्येयासाठीं, वाटेल त्या मार्गाचा अवलंब करावा असा टिळकांच्या म्हणण्याचा निष्कर्ष निघतो, हें म्हणणें 'स्थितप्रज्ञां'च्या बद्दलचें सुद्धां खरें नाहीं.

स्थितप्रज्ञांच्या झालेल्या उत्क्रांतीच्या दृष्टीनें ते म्हणतात, "त्याप्रमाणेंच नीतीच्या राज्यांत स्थितप्रज्ञ पुरुषांचा अधिकार असतो. त्यांच्या मनांत कोणतीच काम्यबुद्धि नसते. म्हणून केवळ शास्त्रतः प्राप्त झालेल्या कर्तव्याखेरीज दुसऱ्या कोणत्याच हेतूनें कर्म करण्यास ते प्रवृत्त होत नसतात. त्यामुळें पाप व पुण्य, नीति किंवा अनीति हे शब्द अत्यंत निर्मल व शुद्ध वासनेच्या या पुरुषांच्या वर्तनास कधींच लागू होत नाहींत. पाप व पुण्य या दोहोंच्या पलीकडे त्यांची मजल गेलेली असते. 'निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः।'" (गी. र. पान ३६८)

याच अर्थाचे उद्गार पान ८३५ वर आहेत : "याचा अर्थ ते निसर्गनियमांच्या पलीकडे गेले आहेत असा नव्हे. तर बहुत जन्मजन्मांच्या पूर्वतपस्येमुळें (प्रयत्नांमुळें) निसर्गनियमांशीं ते इतके एकजीव, समरस होऊन तादात्म्य पावले आहेत कीं, त्यांच्या हातून निसर्गविरोधी वर्तन होणें शक्य नाहीं. ते बोलतील तें सत्य व वागतील तो धर्म असें नव्हे तर, असत्य बोलणें व अधर्मानें वागणें त्यांना शक्य नाहीं. सत्य व अहिंसा हीं जणुं काय त्यांचे स्वभावधर्मच ( Second Nature ) बनतात !" ( गी. र., पान ३८१ )

### राजकारणांत अहिंसा व सत्य यांना मुरड कां ?

अशा स्थितप्रज्ञांनाहि हल्लींच्या जगांत व्यवहारांत कसें वागावें लागतें, याबद्दल ते लिहितात : "आपण ज्या स्थितप्रज्ञाचा विचार करणार, तो कृतयुगांतील पूर्णावस्थेस पोंचलेल्या समाजांत राहणारा नसूनें ज्या समाजांतील बहुतेक लोक स्वार्थांतच गढलेले आहेत अशा कलियुगांतील समाजांत त्यास वागावयाचें आहे. कारण मनुष्याचें ज्ञान कितीहि पूर्ण झालें असलें व त्याची बुद्धि कितीहि साम्यावस्थेस पोंचली असली, तरी कामक्रोधांच्या कह्यांत सांपडलेल्या अशुद्ध बुद्धीच्या लोकांबरोबर वागतांना अहिंसा, दया, शांति, क्षमा इत्यादि नित्य व परमावधीच्या सद्गुणांचाच सर्वप्रकारें सर्वदा स्वीकार करून त्यांचा निभाव लागावयाचा नाहीं. अर्थात् ज्यांत सर्वच स्थितप्रज्ञ, त्या समाजांतील पराकाष्ठेची नीति किंवा धर्माधर्म, आणि लोभी पुरुषांचाच ज्यांत भरणा विशेष त्या समाजांतील धर्माधर्म, हे थोडे तरी भिन्न असलेच पाहिजेत. नाहींपेक्षां साधुपुरुषास हें जग सोडून द्यावें लागेल आणि दुष्टांचेंच सर्वत्र साम्राज्य होईल." ( गी. र. पान ३७३ ). हाच नियम अर्जुनासारख्या सामान्य माणसांनीं, विशेषतः राजे, अधिकारी व राजकारणांत पडलेल्या माणसांनीं, अंतःकरण शुद्ध, निर्वैर व निर्मल ठेवून स्वधर्म, स्वहित, परहित व लोकहित यांच्या रक्षणाकरितां आचरावा असा गीताधर्म कर्तव्य म्हणून सांगितला आहे व तोहि साम, दाम, दंड, भेद या उत्तरोत्तर नीच पण आवश्यक श्रेणीनें आचरावा असें सांगितलें आहे.

म्हणजे ज्याला आपण समाजांतील कायदा व सुव्यवस्था ( Law and Order ) म्हणतों ती राहण्याकरितां व अराजक उत्पन्न होऊं नये या उद्देशानें हा उपदेश व मार्गदर्शन आहे. श्री. तात्या-

[1] 'गीता-रहस्या'चे सर्व उल्लेख पूर्व-आवृत्त्यांच्या पानांवरून दिले आहेत.

साहेब करंदीकरांनीं टिळकांचा हाच विचार " निर-पवाद अहिंसा व निरपवाद सत्य या अपूर्ण जगांत शक्य नसून साधुसंतांचा तो मार्ग असला तरी व्यवहारांत व राजकारणांत अहिंसा व सत्य यांना मुरड घालावी लागते " या शब्दांत सुंदर रीतीनें सांगितला आहे ('केसरी' ता. १६।५।५०, पान २)

यावर गांधीजींचा उपाय म्हणजे हिंसक व लबाड लोकांचा हृदयपालट होय. पण 'स्वभावो दुरतिक्रमः' या म्हणीप्रमाणें हा हृदयपालट अत्यंत दुष्कर व कालावधीचा. हा अनुभव प्रत्येकाला स्वानुभवावरून सांगतां येईल मग दुराचारी दुष्ट लोकांची गोष्ट कशाला ? हा हृदयपालट, रामाकडून रावणाचा अंगदशिष्टाईनें, किंवा दुर्योधन–दुःशासनादिकांचा श्रीकृष्णाकडूनहि यशस्वी झाला नाहीं, मग इतरेजनांची गोष्ट कशाला ! तर मग हा हृदयपालट होईपर्यंतच्या सज्जन व निरुपद्रवी लोकांच्या जीवित-वित्ताच्या नाशाचा व स्त्रियांवरील बलात्कार व त्यांची विटंबना यांचा विचार काय ? दुर्जनांच्या अराजकाचें साम्राज्य माजेल याचा विचार काय ? कां ही सर्व अनवस्था दुराचाऱ्यांचा हृदयपालट होईपर्यंत होत राहूं द्यावयाची ? मग सुधारलेल्या समाजांत शासन-पद्धतीची आवश्यकता ती कोणती ? ही सर्व विचार-पद्धति उच्चतर नाहींच पण विचाराची दुर्बलता व आत्यंतिक अनवस्था होय. या दृष्टीनें हल्लींच्या अपूर्ण जगांत, दुराचाऱ्यांच्या अराजकतेच्या साम्राज्यास आळा घालण्याकरितां व सज्जन व निरपराधी लोकांच्या रक्षणाकरितां, निरपवाद सत्य व अहिंसा या तत्त्वांस मुरड घालून सामान्य जनांनीं व राजे व राजकारणी पुरुषांनीं अंतःकरण शुद्ध व निर्वैर ठेवून व्यवहार करणें हें त्यांचें कर्तव्य आहे, हा टिळकांचा सिद्धान्त निर्दोष आहे. यावरून सामान्य जनांना-सुद्धां वर्तनाचें वाटेल तें रान मोकळें असावें असें लो. टिळक म्हणत नाहींत हें स्पष्ट आहे व आपल्या सिद्धान्ताच्या आधाराकरितां त्यांनीं महाभारतांतून अनेक उतारे दिले आहेत (गी. र., पानें ३४ ते ३७). त्यांपैकीं एक पूर्वाचार्य सनत्कुमारादिकांच्या वचनाचा आहे. तो असा :

" सत्यस्य वचनं श्रेयः सत्यादपि हितं वदेत् ।
यद् भूतहितमत्यंतं एतत् सत्यं मतं मम ॥ "

## टिळकांनीं प्रायश्चित्ताचाहि विचार केला आहे

पण अत्यंत लक्षांत घेण्यासारखी गोष्ट म्हणजे वरील सिद्धान्त सध्यांच्या जगांत आवश्यक म्हणून मांडल्यानंतर त्या सिद्धान्ताच्या सापवाद व सापेक्ष निर्दोषत्वाची त्यांना पूर्ण जाणीव होती. म्हणून त्यांनीं, " मनु व याज्ञवल्क्य असत्या प्रसंगांची सत्यापवादांत गणना करतात हें खरें पण तसें करणेंहि त्यांच्या मतें सामान्यतः गौणच असल्यामुळें त्यांनीं 'तत्पावनाय निर्वाप्यश्चरुः सारस्वतो द्विजैः' असें शेवटीं त्यास प्रायश्चित्त सांगितलें आहे (याज्ञ. २.८३, मनु. ८.१०४–१०६)" असा उल्लेख केला. (गी. र. पान ३५)

पुनः हाच मुद्दा (पानें ३७–३८ वर) चार्चितांना ते म्हणतात : " तथापि सत्यादि नीतिधर्म त्यांच्या मतें नित्य म्हणजे सर्वकालीं एकसारखेच अबाधित असल्यामुळें, पारलौकिक दृष्ट्या असले प्रसंग सामान्यतः थोडें तरी पापच होय असें ठरवून त्यांनीं प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत." (गी. र. पा. ३७). हीं प्रायश्चित्तें निरर्थक बाऊ नव्हत असें म्हणून युधिष्ठिराचा रथ 'नरो वा कुंजरो वा' असें म्हटल्यानें जमिनीवर आला व अर्जुनाला, भीष्माचा वध शिखंडीला पुढें करून केल्यामुळें, आपला मुलगा बभ्रुवाहन याजकडून पराभव सहन करणें भाग पडलें ( अर्थातच ही भाषा सांकेतिक आहे. निसर्ग-नियमांप्रमाणें स्वर्गनरकादि भोग-भूमिकांवर वरील दोघा बंधूंना काय प्रत्यक्ष भोगावें लागलें असेल हा प्रश्न आहे ) हीं उदाहरणें देऊन टिळक म्हणतात :

" आत्महेतोः परार्थे वा नर्महास्याश्रयात्तथा ।
ये मृषा न वदंतीहि ते नराः स्वर्गगामिनः ।

'स्वार्थाकरितां, परहितार्थ, किंवा थट्टेनेंहि जे पुरुष या जगीं कधीं देखील खोटें बोलत नाहींत त्यांसच स्वर्गप्राप्ति होते'-(म. भा. अनु० १४४.१९) असा आमच्या शास्त्रकारांचा अखेरचा तात्त्विक सिद्धान्त आहे हें व्यक्त होतें." (गी. र., पान ३८)

लो. टिळक व त्यांचे अनुयायी यांच्यामध्यें जो मोठा फरक आहे तो हाच. हे अनुयायी वरील प्रायश्चित्तभागाचा कधींहि उल्लेख करीत नाहींत; उलट असें लिहितात कीं, " पण याला गीतेनें










व आपल्या इतर शास्त्रकारांनीं स्पष्ट उत्तर दिलें आहे कीं, असली हिंसा ही हिंसाच नव्हे; व त्या घोर कृत्याची जबाबदारी दुष्ट माणसावरच पडते, त्याला शिक्षा देणाऱ्यावर पडत नाहीं.'' (रा. करंदीकर 'केसरी' १६–५–५०). असली हिंसा ही हिंसाच नव्हे, हें विधान परिस्थितिसापेक्ष व्यवहारदृष्टीचें आहे, तात्त्विक नव्हे हें हे अनुयायी विसरतात.

## हीं खरोखरीं साध्याच्या शुद्धतेचीं लक्षणें !

आतां मुख्य प्रश्न असाः—सज्जनांचें रक्षण व दुर्जनांचें निर्दालन होऊन, दुर्जनांचें साम्राज्य समाजांत माजूं नये म्हणजे गीतेच्या भाषेप्रमाणें लोकसंग्रह साधावा, म्हणून धर्माधर्मांत भिन्नता आवश्यक आहे, असें लो. टिळक म्हणतात. त्यांचाच आशय रा. करंदीकरांनीं 'वर्तनाला मुरड घालावी लागते' या शब्दांत सांगितला आहे. या वर्तनाबद्दल टिळक, प्रायश्चित्त घ्यावें लागतें, असें सांगतात, व त्या प्रायश्चित्तांचा भाग लक्षांत ठेवून सुद्धां साधन म्हणून निरपवाद सत्य, अहिंसा, दया, शांति, क्षमा यांचा सर्वप्रकारें सर्वदा स्वीकार करूं नये असें मत देतात (गी. र. पा. ३७३). यावरून 'लोकमान्यांचा कटाक्ष साधनशुचितेवर नव्हता, हें स्पष्ट आहे; त्यांचा कटाक्ष (रोख, जोर, emphasis) कोणत्याहि तऱ्हेनें पण लोकसंग्रह साधावा हाच होता' असा प्रतिपक्षाचा आक्षेप येतो. या आक्षेपास उत्तर म्हणून श्री. करंदीकर, आम्ही वर दिलेले उतारे देऊन, आणखी असें सांगतात कीं, ''अंतःकरणशुद्धि, समत्वबुद्धि, आणि सर्व भूतांना आत्मवत् मानणें, या अत्यंत विशुद्ध तत्त्वांवरच गीतोपदेशाची सारी उभारणी आहे. असें असतां 'गीतारहस्यां'त साधनशुद्धतेचा विचार नाहीं, किंबहुना 'गीतारहस्य' अत्याचाराची तरफदारी करतें असें भासविणें हें कुटिलपणाचें लक्षण आहे''. ('केसरी' १६-५ ५० पान २). पण त्यांनीं हें लक्षांत घेतलेलें नाहीं कीं, वरील सर्व गुण हे अंतर्यामांतील बुद्धीच्या (साध्याच्या) शुद्धतेचीं लक्षणें आहेत; बाह्य साधनाच्या शुद्धतेचीं नाहींत. व साधनांच्या शुचितेबद्दलच तर प्रश्न आहे !

## नीतिधर्माची सापेक्षता

जगामध्यें स्वभावतः उत्क्रांतीच्या किंवा विकासाच्या दृष्टीनें सर्व मानव एकाच पायरीवर नसतात. कांहीं बुद्धिजीवी, तर कांहीं बाहुबलजीवी, कांहीं धनजीवी तर कांहीं श्रमजीवी असतात. याच चार पायऱ्यांचा उल्लेख हिंदुधर्मग्रंथांतून ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र असा आढळतो. ग्रीक तत्त्वज्ञ प्लेटो व फ्रेंच तत्त्वज्ञ ऑगस्ट कॉम्ट वगैरेंसारख्या पाश्चिमात्य तत्त्वज्ञान्यांनीं मानवसमाजाचे हे चार वर्ग ओळखले आहेत. जसें एकंदर जगांत तसें मानवांतहि हें सापेक्षतेचें तत्त्व दृष्टीस पडतें.

लॉर्ड हाल्डेन यांनीं Reign of Relativity ('सापेक्षतेचें साम्राज्य') या नांवाचा एक सुंदर ग्रंथ लिहिला आहे, तो यासंबंधीं वाचण्यासारखा आहे. या जागतिक तत्त्वाला अनुसरून आपल्या हिंदुधर्मांत वर्णाश्रमव्यवस्था सांगितली आहे. हेंच तत्त्व पाश्चिमात्य तत्त्वज्ञ Relativity of Ethics (नीतिधर्माची सापेक्षता) या शब्दांत सांगतात. म्हणून वरील चार वर्गांच्या माणसांचे धर्म (कर्तव्यें) सांगतांना, त्यांच्या त्यांच्या उत्क्रांतीच्या दृष्टीनेंच त्या त्या धर्मांची उंची व प्रमाण शास्त्रकारांनीं आंखलेलें आहे. सत्य–अहिंसा आदि सद्गुण समाजांतील सर्वच माणसांमध्यें आवश्यक आहेत. पण त्यांची उंची व प्रमाण हीं ब्राह्मणांकडून, आत्यंतिक तऱ्हेचीं अपेक्षिलीं आहेत. त्या दृष्टीनें, या सत्य-अहिंसा-गुणांचें आचरण दुसऱ्यांच्या आक्रमणापासून समाजाचें रक्षण जर करावयाचें असेल व त्याकरितांच ज्या क्षत्रियवर्गाची समाजव्यवस्थेंत योजना आहे, त्याच्याकडून होणें शक्य नाहीं म्हणून त्या तऱ्हेचें अपेक्षिलेलेंहि नाहीं. त्याप्रमाणेंच वैश्यांचीहि स्थिति समजावी. शूद्रांच्यावर, तर 'परिचर्या' म्हणजे 'आज्ञाधारकता' याशिवाय जास्त बोजा ठेवलेला नाहीं. कुटुंबांतील लहान मुलांप्रमाणें, समाजांतील तीं लहान मुलें आहेत. त्यांजवर दुसरा बोजा नाहीं. हे सर्व लक्षांत घेऊन या अपूर्ण जगाकरितां वरील सत्य–अहिंसेचा सापवाद सिद्धान्त लबाड व दुराचारी लोकांपासून रक्षण करण्याकरितां म्हणून घातला आहे.

## गांधीवाद टिळकवादापुढें कसा ?

गांधींच्या कोणत्याहि विचारांत हा सापेक्षतेचा भाग येत नाहीं. सत्य म्हणजे सत्य, अहिंसा म्हणजे अहिंसा. हिंदी राजकारणांत हा उपदेश त्यांनीं

सर्वांस सर्व हिंदी जनतेला—मग ती कोणत्याहि दर्जाची असो—केला आहे. हाच उपदेश येथेंच न थांबवितां दुसऱ्या महायुद्धाच्या वेळीं त्यांनीं हिट्लर, व चर्चिल यांना सुद्धां केला. येवढेंच नव्हे, तर १९३७ सालीं काँग्रेसपक्ष अधिकारारूढ झाल्यावर, मुंबईच्या मंत्रिमंडळाला—त्यांचा कारभार पोलिस, न्यायखातें किंवा सैन्य, यांच्या शिवाय कसा चालवितां येईल यावद्दल त्यांनीं प्रवचनेंहि झोडलीं. या सर्व प्रकरणांत त्यांना जगांतील सापेक्षतेचें अज्ञान होतें–(पण त्यांच्या बुद्धिमत्तेवरून हें शक्य दिसत नाहीं!)—,कीं समजूनउमजून तिची त्यांनीं आपल्या आत्यंतिक नीतिधर्माच्या दृष्टीकरितां उपेक्षा केली, कीं स्वतः आरंभिलेल्या स्वातंत्र्यलढ्यामध्यें जाणूनबुजून कायदेभंग करावयाचा होता म्हणून राज्यकर्त्यांना दाखविण्याकरितां म्हणून ही सत्य—अहिंसेची ढाल काँग्रेसकरितां तयार केली! यांपैकीं कोणती वस्तुस्थिति होती हें सांगणें कठिण आहे. पण या संबंधांत एक मनोरंजक आख्यायिका कानांवर आलेली आठवते कीं, अहिंसा-तत्त्वाचा घोंटाळा पाहून, एक गृहस्थ सरदार पटेलांकडे गेले व म्हणाले "सरदारजी यह अहिंसा चीज क्या है?" सरदारजी उत्तरले: "मैं भी नहीं जानता हूँ यह क्या चीज है; लेकिन यह काम देती है." पण इतकें खरें कीं, वरील उपदेश हिट्लर व चर्चिल यांना तर पटला नाहींच; पण मुंबईच्या मंत्रिमंडळालाहि पटला नाहीं. श्री. मुनशींनीं मुंबईतील मजुरांचे दंगे कसे मोडले हें सर्वविश्रुत आहे. हल्लीं हिंदुस्थानच्या पुढाऱ्यांनीं—विशेषतः पंडित नेहरू, सरदार पटेल, राजेंद्रबाबू, श्री. राजगोपाळाचारियर या सर्व पट्टशिष्यांनीं मिळून—जी हिंदुस्थानची घटना केली आहे तिच्या स्वरूपावरून, वरील उपदेश त्यांच्या वरिष्ठ दर्जाच्या शिष्यांनाहि पटलेला नाहीं हें स्पष्ट आहे. मग हल्लीं एकंदर हिंदुस्थानांत व्यापाऱ्यांचा काळा बाजार व अधिकाऱ्यांची लांचलुचपत, वशिलेबाजी व अधिकाराच्या जागांकरितां धडपड यांची जी बजबजपुरी माजली आहे, तिची गोष्टच बोलावयास नको! तेव्हां जगांतील सापेक्षतेच्या दृष्टीनें ज्या विचारपद्धतींत स्वयंसिद्ध दोष आहेत, जी विचारभूमिका थोराथोरांनाहि पटली नाहीं, आचारदृष्टीनें जो उपदेश डोळ्यांसमोर असूनसुद्धां लोकांच्या आचरणांत कधींहि आला नाहीं, तो उपदेश, विचार किंवा वाद टिळकवादाच्या पुढें गेला हें म्हणणें फोल आहे.

### थिऑसफीमधील सूक्ष्म विचार

साध्य-साधनांचा विचार शुद्धाशुद्ध स्वरूपांप्रमाणें त्यांच्या त्यांच्या भूमिकेवर वेगवेगळा होतो. Each force works on its own plane. माणसाच्या हातून होणाऱ्या प्रत्येक क्रियेला दोन बाजू असतात. एक मानसिक, वैचारिक; हिलाच आपण वरील विवेचनांत, अंतःकरणांतील प्रेरकबुद्धि अथवा हेतु असें म्हटलें आहे. ही एक शक्ति आहे. हिची विपाक-(fruition)-भूमिका स्वर्गलोक अगर नरक (भुवर्लोक) होय. क्रियेची दुसरी बाजू शारीरिक; हिलाच हेतु साध्य करण्याकरितां केलेलें कर्म म्हणतात. या बाजूलाच 'गीतारहस्यां'त बाह्यकर्म (जडकर्म) असें म्हटलें आहे (गी. र. पा. ३६९) व हीहि एक शक्ति आहे. हिची विपाकभूमि दृश्य सृष्टि—भूलोक—होय. आतां ज्या वेळीं केलेल्या क्रियेचा हेतु (साध्य) शुद्ध असेल व कर्महि (साधनहि) शुद्ध असेल, त्या वेळीं ही क्रिया पूर्णतया निष्पाप व निष्कलंक असते. याबद्दल टिळक, गांधी किंवा कोणतेंहि तत्त्वज्ञान यांमध्यें मतभेद नाहीं. मात्र याच कर्माला तेवढें गांधी निष्पाप व निर्दोष समजतात. आतां ज्यांत हेतु व कर्म (साधन) हीं दोन्हींहि अशुद्ध आहेत त्याहि क्रियेला टिळक व गांधी व सर्वच तत्त्वज्ञानी पापमय व सदोष समजतात. परंतु जेव्हां हेतु शुद्ध असतो, पण कर्म (साधन) हें अशुद्ध असतें त्या वेळीं त्यामध्यें कोणत्याहि प्रसंगानें मुरड घातलेली गांधींना खपत नाहीं. पण लोकमान्य टिळक मात्र, अंतःकरणांतील प्रेरक शक्ति जी बुद्धि अगर हेतु, त्याची शुद्धता लक्षांत घेऊन लोकसंग्रहार्थ म्हणजे सज्जनांचें रक्षण व दुष्टांचें निर्दालन या हेतूंच्या सिद्धयर्थ, साधनांची अशुचिता म्हणजे सत्य—अहिंसादिकांना घातेली मुरड यांचें तौलनिक गौणत्व लक्षांत घेऊन ती क्रिया शुद्धच समजतात. व त्याबद्दल आधार म्हणून पुढील श्लोक देतात:

दूरेण हि अवरं कर्म बुद्धियोगात् धनंजय ।
बुद्धौ शरणं अन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥ ''
(गीता २. ४९)

('बुद्धीच्या दृष्टीनें कर्म हें कमी योग्यतेचें आहे. म्हणून बुद्धीला शरण जा. कर्मफल हाच हेतु मानणारे लोक हीनबुद्धीचे आहेत.')

'मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः ।' 'मनुष्याच्या उन्नतीला अगर अवनतीला कारण 'मन' हेंच आहे.'' ह्यांत सूचित झालेले गीतेचे सिद्धान्त निर्दोष आहेत. कारण प्रत्येक जन्मामध्यें मन हेंच, त्या त्या मृत्यूच्या वेळीं इंद्रियांना आकर्षित करून घेऊन, देहाबाहेर जातें (गी. १५.७) व भुवर्लोकीं व स्वर्लोकीं, त्या त्या जन्मांतील बऱ्या–वाईट कर्मांचा विपाक झाल्यावर, फिरून जन्म घेतें व नवीन अनुभवाला सुरुवात होते. या दृष्टीनें मन हाच मानवाचा जीवात्मा होय. यालाच अंतरात्मा म्हणतात व याच्याच उन्नति-अवनतीवर, त्याचा बंध म्हणजे अवनत स्थिति व मोक्ष म्हणजे उन्नत स्थिति, हीं अवलंबून असतात. हा क्रियेच्या मानसिक बाजूचा विचार झाला, व म्हणूनच टिळक या बाजूवर जोर देतात. पण शारीरिक बाजूच्या दृष्टीनें, ''शारीरं केवलं कर्म कुर्वन् नाप्नोति किल्बिषं'' (गीता ४-२१) ''केवळ शारीरिक कर्म करणाऱ्याला पाप मुळींच लागत नाहीं'' असाहि गीतेचा आधार दिला जातो. पण हा गीतेचा सिद्धान्त सर्वस्वीं निर्दोष नाहीं. कारण कोणतेंहि कर्म केवळ शारीरिक नसतें. प्रत्येक क्रियेच्या पाठीमागें मानसिक बाजू असतेच. निदान कर्मब्रह्मार्पणबुद्धि ही असतेच. शिवाय वर दिलेल्या (गी. २-४९) श्लोकांत कर्माची योग्यता बुद्धीपेक्षां कमी इतकेंच म्हटलें आहे. तिला मुळींच किंमत नाहीं असें नाहीं. कारण नुसतें शारीरिक कर्म जर या सिद्धान्ताप्रमाणें पूर्णतया निर्दोष असतें, तर हेतु शुद्ध असून साधन जर अशुद्ध असलें तर त्याबद्दल प्रायश्चित्त घ्यावें लागतें, असें टिळकांनीच दिलेल्या व वर उल्लेख केलेल्या मनु, याज्ञवल्क्य व महाभारतकार इत्यादि शास्त्रकारांच्या अवतरणांवरूनच स्पष्ट झालेलें आहे. मग, ज्या कर्माला प्रायश्चित्त सांगितलें त्यांत किल्बिष कांहींहि नाहीं, हें सांगणें कसें जमेल ?

वरील विवेचनावरून हें उघड आहे कीं, टिळक व गांधी हे दोघेहि कोणत्याहि कर्माचें सदोष-निर्दोष स्वरूप, बुद्धि व कर्म (साध्य व साधन) यांचा एकत्रित विचार करून ठरवितात. पण थिऑसफीच्या तत्त्वज्ञानांत हेतु व कर्म यांचा स्वतंत्र रीत्या, कर्म-विपाकाच्या दृष्टीनें, वेगवेगळा विचार केला जातो. क्रियेची जी मानसिक बाजू (बुद्धि, हेतु) ही एक शक्ति आहे; व तिची विपाकभूमि, तिच्या शुद्धाशुद्ध स्वरूपाप्रमाणें स्वर्गलोक अगर नरक (भुवर्लोक) असते. क्रियेची शारीरिक बाजू 'कर्म' (साधन) हीहि एक दुसरी शक्ति आहे. तिची विपाकभूमि (Plane of Fruition) भूलोक म्हणजे दृश्य सृष्टि आहे. थिऑसफीच्या तत्त्वज्ञानाची विचारपद्धति अशी आहे कीं, (each force works upon its own plane) प्रत्येक शक्तीचा विपाक तिच्या तिच्या विवक्षित भूमिकेवर स्वतंत्र व वेगवेगळा होतो. म्हणून हेतु अशुद्ध असेल तर ती क्रिया बंधनकारक होऊन अवनतीला नेते, म्हणजे मोक्षप्राप्ति दूरावते; व हेतु शुद्ध असला तर उन्नति होऊन ती क्रिया मोक्षदायक होते. शुद्ध म्हणजे त्या त्या भूमिकेवरील निसर्गनियमांना धरून अनुकूल व समरस असें जें तें व अशुद्ध म्हणजे त्या त्या भूमिकेवरील निसर्गनियमांशीं विषम व विरोधक असें जें तें. पण हेतु शुद्ध असूनसुद्धां जर साधन, कर्म अशुद्ध असेल तर त्याचा विपाक, पुढील जन्मीं भूलोकीं, अल्पायुष्य, रोगप्राप्ति, हालअपेष्टा, दारिद्र्य, छळ वगैरे रूपांनीं प्रकट होतो. पुष्कळ वेळां शुद्ध हेतूनें, पण कर्तव्य-बुद्धीनें माणसें जीं कर्में करतात, त्यायोगें अजाणतां जनतेमध्यें भलतेच बुद्धिभेद उत्पन्न होऊन, फ्रेंच राज्यक्रांतींत किंवा गांधींच्या कायदेभंगाच्या चळवळींत झाले तसे दंगे–धोपे, हत्या–खून वगैरे उत्पात होतात. व त्या पार्थिव सृष्टींतील घटनांचे परिणाम, राजकारणी पुरुषांना व साधुसंतांनाहि वरील हालअपेष्टांच्या रूपानें भोगावे लागतात, हें निष्पाप बुद्धीचे हरिश्चंद्र, युधिष्ठिर, ज्ञानेश्वर, तुकाराम यांच्या छळावरून स्पष्ट होईल. शास्त्रकारांनीं सांगितलेलें प्रायश्चित्त तें हेंच होय. लोकमान्य टिळकांनीं या प्रायश्चित्तभागाकडे बुद्धिपुरःसर लोकसंग्रहार्थ दुर्लक्ष केलें आहे, व यांतच त्यांची जन्म-








जात क्षात्रवृत्ति प्रकट होते. पण म्हणून बुद्धि शुद्ध असली तर साधन अशुद्ध असलें तरी चालेल, असें म्हणणें निःसंशय सदोष आहे.

आतां दुसरी बाजू. हेतु अशुद्ध पण साधन शुद्ध या क्रियेचें स्वरूप काय ? लोकमान्यांचा हेतु, लोकसंग्रहाची वाट मुख्यतः दुराचारी लोकांच्या कपटी वृत्तीपासून सुरक्षित करण्याचा असल्यामुळें त्यांनीं या बाजूचा विचार केलेला नाहीं. असेल तर एखाद्या ठिकाणीं त्रोटक उल्लेख आहे. पण या क्रियेचें स्वरूप साधन शुद्ध असून हेतु अशुद्ध म्हणून सर्व क्रिया अशुद्धच असा त्यांचा स्पष्ट निर्णय असणार. पण थिऑसफीचा विचार प्रत्येक भूमिकेचा एकत्रित नसून वेगळा–वेगळा असल्यामुळें, तिचा निर्णय असा कीं, हेतु अशुद्ध म्हणून कर्त्याची मानसिक अवनति होऊन ती क्रिया बंधनकारक होईल व मोक्ष दूरावेल. पण साधन शुद्ध असल्यामुळें दृश्य पार्थिव सृष्टींत त्याला दीर्घायुष्य, आरोग्य, संपत्ति, लौकिक, मानमान्यता हीं मिळतील. उदाहरणार्थ, एखाद्यानें रुग्णालयाकरितां किंवा जलाशयाकरितां एक लाख रुपये देणगी म्हणून दिले; पण ते परोपकारबुद्धीनें नसून, दुसऱ्या एका शुद्धबुद्धि असलेल्या दात्याच्या दुष्टाव्यानें किंवा मत्सरानें दिले; तर वर लिहिल्याप्रमाणें हेतु अशुद्ध म्हणून त्याची मानसिक अवनति होऊन मोक्ष दूरावेल व कदाचित् अनेक जन्मीं, बुद्धिपालट होईतों, दूरावतच राहील. पण वरील दानानें, तें अशुद्ध बुद्धीनें केलें असतांनाहि जनतेला जें शारीरिक सुख, आराम व आरोग्य मिळेल तें, ज्याचा दुष्टावा केला व ज्याचें दान शुद्धबुद्धीचें होतें, त्याच्या दानानें त्याला जें शारीरिक सुख, आराम व आरोग्य मिळेल त्याच्या बरोबरीचें व तितकेंच, यालाहि निःसंशय मिळेल. म्हणून आपण कित्येक वेळां दुष्ट व दुराचारी लोकांना दीर्घायुष्य व आरोग्य मिळून मोठ्या संपन्नतेंतहि लोळतांना पाहतों.

याप्रमाणें थिऑसफीच्या या विचारपद्धतीनें (१) हेतु शुद्ध असला, पण साधन अशुद्ध असलें तर कर्त्याची उन्नति होत राहते, पण साधन अशुद्ध असल्यानें त्याला अल्पायुष्य, रोगी शरीर, निर्धनता, हाल, छळ वगैरे प्रायश्चित्तें कां भोगावीं लागतात; ( २ ) तसेंच हेतु अशुद्ध असला तर कर्त्याची मानसिक अवनति होते व होत राहते, पण साधन शुद्ध असल्यामुळें त्याला दीर्घायुष्य, निकोप शरीर, संपन्नता, लौकिक, मानमान्यता हीं कां मिळतात; या दोन्ही प्रश्नांचा "each force works upon its own plane" 'प्रत्येक शक्ति आपापल्या शुद्धाशुद्ध स्वरूपाप्रमाणें सुखदायक अगर दुःखदायक विपाक पावते', या एका साध्या, सुगम व सूक्ष्मतर तत्त्वाच्या ज्ञानानें एकदम उलगडा होतो.

---

## " एक स्वामी बस्स आहेत ! "

बेझवाडा स्टेशनहून गाडी बदलून तिरुवेन्नामलयला—श्रीरमणमहर्षींचा आश्रम येथेंच होता—जातां येतें. आम्हीं मद्रासहून परत येत होतों. तेव्हां वाटेंत महर्षींच्या गोष्टी निघाल्या. राजेन्द्रबाबू व जमनालालजी त्यांच्या आश्रमांत जाऊन आले होते. त्यांनीं तेथील शांत वातावरणाची बापूंपुढें खूपच स्तुति केली होती.

कृष्णा नदीच्या पुलावरून आमची गाडी चालली असतां बापूंनीं काकांना ( महादेवभाईंना ) एकदां महर्षींचा आश्रम पाहून येण्यास सांगितलें. काका जावयाला तयार झाले. मीं त्यांचा बिस्तरा तयार करूं लागलों. तेवढ्यांत बापू म्हणाले : ' महादेव, तुम्हांला तेथें बरें वाटलें तर दोन-तीन महिने तेथेंच राहा. ' काकांनीं लगेच बिस्तरा सोडून टाकला आणि म्हटलें : बापू, मला जायचें नाहीं. '

' कां बरं ? '

' मला एक स्वामी आहेत ते बस्स आहेत, दुसरे करायचे नाहींत '.

बापूंनीं अधिक आग्रह केला नाहीं.

—श्री. नारायण देसाई : " शिक्षण अने साहित्य " जुलै, १९५०

श्री. माधवराव बागल

# चीनमधील कला

जगाच्या संस्कृतींत कोणत्या देशानें कशाची भर टाकली यांचा विचार केला तर असें म्हणतां येईल कीं, हिंदुस्थाननें जगाच्या संस्कृतींत वेदान्तविचाराची फार मोठी भर घातली; पाश्चिमात्य राष्ट्रांनीं तींत शास्त्रीय संशोधनाची भर घातली; चीननें आपल्या कलेची भर टाकली. या विधानांत फारसा मत-भेदहि आढळून येणार नाहीं. कलाविभागांतहि निसर्गसौंदर्य हें चीनचें वैशिष्ट्य आहे. चिनी मातीचीं भांडीं, चिनी फुलदाण्या, कपबश्या, तबकड्या, पंखे, पडदे, कोणतेंहि कलाकुसरीचें काम घेतलें तरी, त्यावर निसर्गातील एखादा देखावाच काढलेला दिसून येईल. त्या चित्रांत हस्तकौशल्य तर दिसेलच दिसेल पण तें पाहून त्यांत त्या कलावंताची वैचारिक उंची, त्याचा बौद्धिक विकास, त्या देखाव्याकडे पाहण्याची त्याची वैचारिक सूक्ष्म नजरच त्यांत विशेषेंकडून दिसून येईल. चिनी चित्रकार हा निर्बुद्ध तंत्रविशारद नसतो. मनन, चिंतन, अभ्यास आणि निरीक्षण यांतून त्याच्या मनावर उठलेले पडसाद चित्रित करण्यासाठींच त्यानें कुंचला हातीं घेतलेला असतो. यामुळेंच वस्तुस्थितिनिदर्शनापेक्षां सूचकतेवरच त्याचा मुख्य भर असतो. दिसतें तसें त्यापेक्षां आवडतें तें तो चित्रित करण्याचा प्रयत्न करतो.

गानमाधुर्य आणि रेषासौंदर्य हीं निसर्गांतच आढळून येतात. जललहरींत, वृक्षराजींतून वाट काढीत जाणाऱ्या वायुलहरींत, आणि वाऱ्याबरोबर डुलणाऱ्या फुलवेलींत, तालबद्धता आणि एकतानता शोधतां येते. मनुष्यनिर्मित काटकोनी इमारती आणि लांकडाचे ठोकळे सोडले तर निसर्गांत रेषासौंदर्य भरून राहिलें आहे.

पाश्चिमात्य चित्रकारांनीं हें रेषासौंदर्य सुंदर युवतींच्या अंगसौष्ठवांत पाहिलें. त्यांनीं त्याला चित्रकलेंत आणि शिल्पकलेंत मूर्तस्वरूप दिलें. चिनी चित्रकारांनीं तें निसर्गांत पाहिलें आणि पकडून ठेवलें. मुरड घेत जाणाऱ्या वेलीच्या जाळ्यांतून, वृक्षांच्या फांद्यांतून, फुलांच्या जोरदार देंठांतून पशुपक्ष्यांच्या देहयष्टींतून आणि हालचालींतून त्यांनीं तें शोधून काढलें. रेषेच्या गतीचा त्यांनीं तेथें शोध लावला.

## चित्रकलेची सुरुवात लिपींतून

चिनी चित्रकलेची सुरुवात त्यांच्या लिपींतून झाली. रेषाशास्त्र त्यांनीं हस्ताक्षरांत वाढविलें आणि बसविलें. चिनी कलेचें वैशिष्ट्य त्यांच्या लिपींत आढळतें. त्यांच्या हस्ताक्षरांत सौंदर्यहीन सरळ रेषा आढळणार नाहींत. त्यांचें स्थापत्यशास्त्राचे नियमहि हस्ताक्षरावरूनच बसवले आहेत. गणितशास्त्र ज्याप्रमाणें एंजिनिअरिंग व ज्योतिषशास्त्र यांचा पाया समजलें जातें, त्याप्रमाणें कलेच्या विषयांतील रचनाशास्त्राचा पाया हस्ताक्षर होय असें चिनी कलावंत मानतात.

रंगित चित्रानें कोणत्या तरी वस्तूचा आभास निर्माण केला जातो, पण निव्वळ रेषाकृतींत रेषा आणि रचनासौंदर्यच प्रतीत होत असतें. याच मूलभूत पायावर चिनी लिपि बसविलेली आहे. या रेषा-सौंदर्याचा व ओघवती गतिमान् रेषेचा उगम मात्र निसर्गातील वृक्ष, वेली, फुलें आणि वनचर प्राणी यांतील रेषासौंदर्यांतूनच झाला आहे. फुलांच्या देंठांची ओघवती रेषा, वेलींच्या काड्यांचा पिसारा, झाप टाकणाऱ्या चित्त्याची बांकदार यष्टि, वाघाचा लवचिक पण जबरदस्त पंजा, वायुवेगानें जाणारी

हरणाची उडी, तीरासारखा सुटणारा त्याचा अंगविक्षेप, हत्तीचा बोजड देह आणि त्याला साजेशी बोजड चाल—अशा विविध प्रकारच्या रेषासौंदर्यांतून चिनी कलावंतांनीं रेषासौंदर्याचे ठोकताळे बसविले आहेत. निसर्गांतील प्राण्यांच्या आणि वनस्पतींच्या आकारांच्या रेषा पाहिल्या तर त्या गतिमान् आढळतात. त्या मोडक्या, तुटक्या किंवा फूटपट्टीनें आंखलेल्या रेषेप्रमाणें सरळ आढळणार नाहींत. काळजीनें बिचकत काढलेल्या रेषेपेक्षां भर्रकन् ओढलेली बांकदार रेषा मनाला आनंद देते. कारण ती गति दाखवते. रेघ ओढलेली, चुकली म्हणून पुनः पुसलेली आणि नंतर सरळ केलेली मनाला कशी-शीच वाटते.

चित्रकलेंत दोन्ही बाजू सारख्या असलेल्या वस्तूंना उच्च स्थान नाहीं. आणि चौकोनी पेटीपेक्षां, कडा मोडलेली बांकदार पेटी किंवा दोन्ही बाजवा सारख्या असलेल्या पेल्यापेक्षां फुलदाणीच डोळ्यांना बरी वाटते. खिळ्याच्या ठोकळेबाज अक्षरापेक्षां नक्षीदार अक्षरांचे फलकच मन वेधून घेतात.

कागदावर किंवा कापडा-( canvas )वर रंग भरण्याची चिनी कलावंताची पद्धति पाश्चिमात्य कलावंतांहून निराळी आहे. युरोपीय चित्रकार बहुतेक सर्व जागा रंगानें भरून घेतात. मोकळी जागा ठेवलेली त्यांना आवडत नाहीं. जागा सर्व भरली नाहीं तर चित्र पुरें झालें असें त्यांना वाटत नाहीं. चिनी चित्रकार आवश्यक असेल तेवढीच जागा भरून काढतो. त्याच्या चित्रांत पुष्कळ जागा मोकळ्याच सोडलेल्या आढळतात. मुख्य विषयाला पूरक नसतील त्या गोष्टींना मुद्दाम टाळण्यांत येतें. निसर्ग रंगवितांना त्याच्या मनावर ज्या भावनांचा विशेष परिणाम झाला असेल त्यांनाच प्राधान्य देऊन इतर गोष्टी जाणूनबुजून गाळल्या जातात. देखाव्यांतील प्रत्येक गोष्टीकडे लक्ष देऊन त्या काढण्यांत येत नाहींत. त्यामुळें निरर्थक जागा मोकळ्याच सोडल्या जातात. पाहणाऱ्याच्या प्रतिभेला आणि विचाराला कुंठित करण्याइतका पुरेपणा चित्रांत कधींच आणला जात नाहीं.

## रेषेला प्राधान्य

लिपि, चित्रकला आणि काव्य यांचा चिनी कलासंस्कृतींत फार जवळचा संबंध आहे. या तिन्ही कलांच्या मिलाफांतूनच उच्च दर्जाची कलानिर्मिति झाली आहे. लिपींतून रचनातंत्र निर्माण झालें आहे. काव्यदृष्टि आणि विद्याव्यासंग यांनीं तिच्यांत आत्मा ओतला आहे. रंगानें तिला मूर्त स्वरूप आणलें आहे. अलीकडच्या ( modern ) पाश्चिमात्य चित्रकलेंत रंगाला इतकें प्राधान्य दिलें जात आहे कीं, त्यामुळें त्यांतून रेषेचें जवळ जवळ उच्चाटनच झालें आहे ! रेषानैपुण्याकडे दुर्लक्ष झालें आहे.

चिनी चित्रकलेंत रेषेलाच फार प्राधान्य असल्यानें रंग भरले तरी 'आउटलाइन'कडे दुर्लक्ष केलें जात नाहीं. हिंदी रंगचित्रांतसुद्धां चित्र पुरें झालें तरी 'आऊटलाइन' ही राखली जाते. चिनी चित्रकारांचें तर तें वैशिष्ट्य आहे. फोटोग्राफ सूचकतेला वाव ठेवीत नाहीं. पाहण्याचे विचार तेथें थांबतात. सूचकता हा गुण तर चिनी कलावंत अत्यंत आवश्यक मानतो. म्हणून चित्र कुठें पुरें करावें आणि किती अपुरें ठेवावें हें समजणें फार अवघड आहे. येथें कलावंताच्या तंत्रापेक्षा त्याच्या वैचारिक विकासाची कसोटी लागते. कवीचें हृदय हवें असतें.

एखादा चित्रकार खूप मेहनत घेऊन, कित्येक महिने खर्च करून, चित्रांत आपल्या हस्तकौशल्याची सीमा गांठतो. दुसरा एखादा चित्रकार अभ्यासांत जन्म घातल्यानंतर, त्या देखाव्यांतील सार कुंचल्याच्या कांहीं फटकाऱ्यांनीं एक दोन तासांत किंवा त्याहूनहि थोड्या वेळांत सहज लीलेनें दाखवूं शकतो; आणि त्यांत त्याला समाधान वाटतें. जास्त काम करण्याचा मोह तो आवरून धरतो. निर्बुद्धपणानें बारीकसारीक काम करणें त्याच्यानें होत नाहीं.

## चिनी चित्रांची सूचकता

बहुतेक चिनी चित्रकार प्रथम विद्याव्यासंगी लेखक आणि साहित्यिक असल्यामुळें चिनी चित्रकलेवर वैचारिक पगडाच विशेष पडला. चित्रकला

हा धंदेवाईक कलावंताचा विषय न होतां तो विद्वानाचा झाला. आणि म्हणून कुंचला हातीं घेतांच तो प्रथम कल्पनेनें स्फुरित होई आणि मग रंगांत भिजे. या वृत्तीमुळें डोळ्यांना दिसणाऱ्या गोष्टी जशाच्या तशा काढण्यापेक्षां त्या देखाव्याचे मनावर झालेले संकलित परिणाम चित्रांत आणले जातात. सूचकता हा चिनी चित्रकलेंतील महत्त्वाचा गुण आहे.

पुढील उदाहरणांवरून चित्रांत सूचकता कशी दाखविली जाते याची कल्पना येऊं शकेल: चित्राच्या चढाओढीसाठीं "पुलाजवळील बांबूच्या बेटांत असलेलें दारूचें दुकान" हा विषय दिला होता. पुष्कळ चित्रकारांनीं आपल्या बुद्ध्यनुसार करील विषयाची मांडणी करून चित्र काढलें. कांहींनीं दारूच्या दुकानाला प्राधान्य दिलें. कांहींनीं आपआपल्या कल्पनेनुसार चित्रें काढलीं. एका चित्रकारानें मात्र असें काढलें: पूल, पुलाजवळ बांबूचें गर्द बेट; त्यांतून झोपडी कांहींच दिसत नव्हती; फक्त झाडीबाहेर एका खांबाच्या पाटीवर तेवढें 'दारूचें दुकान' अशीं अक्षरें लिहिलीं होतीं. या पाटीवरून आंतील दारूच्या दुकानाची कल्पना दिली गेली होती. यांत झोपडीचें अस्तित्व निव्वळ प्रेक्षकांच्या कल्पनाशक्तीवर सोंपवून दिलें होतें. या चित्राला पहिलें बक्षिस मिळालें.

"निर्जन अरण्यांतील नदींतून नावाड्यानें सोडून दिलेली नाव तशीच वहात आहे" असा दुसरा एक विषय चित्रासाठीं दिला होता. बक्षिस मिळालेल्या चित्राची मांडणी पुढीलप्रमाणें होती: 'निर्जन जंगलांतून नदी वहात आहे. पाण्याच्या ओघावरून बोट चालली आहे. बोट नावाड्या—शिवाय चालली आहे. व आंत कोणी नाहीं हें दाखवण्याकरितां नावेच्या एका खुंटावर पक्षी बसला आहे व त्यावर दुसरा झडप घालतो आहे.' नुसतीच नाव दाखविण्यापेक्षां त्यावर पक्षी बसल्याचें दाखविल्यानें, नावेवर किंवा नावेजवळ मनुष्य नसल्याचें अधिक स्पष्ट होऊं शकलें. या सूचकतेला या चित्रांत महत्त्व आलें आहे. म्हणूनच या चित्राला पहिलें बक्षिस मिळूं शकलें. The constant care of the Chinese artist is to leave something to the imagination.

याच सूचकतेचें आणखी एक मनोरंजक उदाहरण आहे. तें असें:

'एका राजविलासी बंगल्यांतील ऐश्वर्य' दाखविण्यासाठीं पुष्कळ चित्रें काढलीं होतीं. पाश्चिमात्य चित्रकार हे थाटमाटी रंगमहाल, त्यांत चाललेला नाच, दारूच्या फुटत असलेल्या बाटल्या, बंगल्याबाहेर रुबाबदार कपडे घातलेले नोकर व उंची उंची मोटारी इत्यादि दाखवून ऐश्वर्याची कल्पना आणून देणार! चिनी चित्रकारानें बाहेर दिसणारें ऐश्वर्य दाखविलें नाहीं. पार्श्वभूमींत एक बंगला दाखवला. बाहेरून त्याचा फक्त आकारच दिसत होता. बंगल्याच्या पाठीमागील दारांतून मोलकरीण मेजवानीनंतर अवशेष बाहेर फेंकून देत होती. श्रीमंती जेवणाचे अवशेष बाहेर पडलेले दाखविले होते. ऐश्वर्याची कल्पना उंची उंची जिन्नस बेफिकीरपणें बाहेर फेंकून देण्यानें येत होती.

वरील उदाहरणांवरून चिनी लोकांची चित्राकडे पाहण्याची विशेष दृष्टि दिसून येईल. म्हणून उच्च कलाकृति निव्वळ तंत्र आणि श्रम यांवर अवलंबून नसून त्यांतील कल्पनेवर आणि सूचकतेवर आहे असें तेथें मानलें जातें.

समोरच्या देखाव्यांतील प्रत्येक झाड, फूल, दगड वगैरे प्रत्येक दृश्य वस्तु परिश्रमपूर्वक दाखविणें याला कलेच्या दृष्टीनें कांहीं महत्त्व नाहीं. एखाद्या छायाचित्राची चौक वगैरे पाडून, बरोबर मापें घेऊन, सही सही नक्कल करण्यांत परिश्रम आणि हस्तकौशल्य असेल; पण त्याला बुद्धीची फारशी जरूरी लागत नाहीं. प्रतिभेचा तर तिच्याशीं कांहींच संबंध नसतो. म्हणून कलेच्या दृष्टीनें अशा चित्रांचा दर्जा अगदीं हीन असतो.

निसर्गसौंदर्य हें समोरच्या देखाव्यांतील वस्तुमात्रांत नसतें; तर तें त्या देखाव्यामुळें होणाऱ्या परिणामावर अवलंबून असतें. निसर्गाच्या भावना ज्या चित्रांत विशेषेंकरून दिसतात त्याचाच प्रेक्षकांवर विशेष परिणाम होत असतो. म्हणून प्रभातसमयींची व सूर्यास्तानंतरची ध्यानमय शांतता, सूर्योदयाच्या आणि सूर्यास्ताच्या वेळचें रंगैश्वर्य, दुपारची प्रखरता, वादळाच्या वेळचा प्रक्षोभ, रात्रीची शीतलता, या भावनांचा आविष्कार ज्या चित्रांत दिसेल तें चित्र








प्रेक्षकांच्या हृदयाच्या तारा छेडूं शकतें. हृदयावर त्याचे पडसाद उठूं शकतात. हीं चित्रें मनाला उच्च पातळीवर नेऊं शकतात. निसर्गाच्या भावनेशीं एकरूप झालेला कलावंत त्या देखाव्यांत विखुरलेल्या अनंत वस्तूंत घुटमळत राहूं शकत नाहीं. तो अनंताशीं एकरूप झालेला असतो. म्हणून अशा कलावंताचीं चित्रें हातांतून बाहेर न पडतां तीं हृदयांतून बाहेर पडतात.

## चिनी कलेवर क्रांतीचा परिणाम

आतांपर्यंतच्या माहितीवरून दिसून येईल कीं, चिनी चित्रकलेचा जन्म चिनी कारागिरांमधून झालेला नाहीं. चिनी कलावंत हे प्रथमतः विद्याव्यासंगी, लेखक, कवि किंवा ग्रंथकार असत. त्यांच्या मनांत उद्भवलेले विचार आणि भावना, त्यांच्या मनांत उद्भवणारीं आंदोलनें हीं प्रकट करण्याकरितां त्यांनीं कला ही एक साधन म्हणून वापरली आहे. म्हणून आतांपर्यंत चिनी कलेला चित्रकला म्हणण्यापेक्षां चित्रलेखन म्हणणेंच अधिक सयुक्तिक होईल. आतांपर्यंत या कलावंताची दृष्टि निसर्गाशीं रममाण होण्याकडे आणि निसर्गाचें सौंदर्य बंदिस्त करण्याकडे गेली. पण आधुनिक कम्युनिस्ट राज्यक्रांतीनें या कलावंतांच्या दृष्टीला गिरिशिखरांवरून खालीं आणलें आणि निबिड अरण्यांतून बाहेर काढलें. त्यांची दृष्टि जनतेच्या दैनंदिन हाल-अपेष्टांकडे आणि महत्त्वाकांक्षेकडे खेंचून आणली. क्रांतीचा परिणाम त्यांच्या मनावरहि झाला. क्रांतीची लाट त्यांच्या हृदयांतहि उसळली.

चित्रांचा म्हणजे त्यांतील कल्पनेचा प्रसार व्हावा आणि चटकन् पुष्कळ प्रती काढतां याव्यात म्हणून, ते आपले विचार लांकडावरच्या खोदकामांतून चित्ररूपानें मांडून फैलावूं लागले. चँग कै-शेकनें तुरुंगांत घातलेल्या लेखकांच्या डोक्यांतूनच प्रथम लांकडाचा उपयोग करण्याची कल्पना निघाली. लेखनाला बंदी केल्यामुळें त्यांनीं हें साधन शोधून काढलें. बहुजन-समाज हा शिक्षित नसल्यामुळें त्यांना सहज समजावें म्हणून या क्रांतिकारकांनीं लांकडावरील चित्रांचा फैलाव केला. छपाईच्या दृष्टीनें हें साधन फार उपयुक्त ठरलें. ज्यानें हें लांकडाचें ( wood-cut ) खोदकाम सुरू केलें तो ' जौ-शी ' हा कलावंत स्वतः लघुकथालेखक होता. ' कीथ कोलविझ ' या बाईच्या छापील चित्रांनीं याला स्फूर्ति दिली. कुओमिन्टांगच्या पोलिसांनीं त्याच्या क्रांतिकारक चित्रांबद्दल त्याला पकडलें आणि गोळी घालून ठार केलें. कीथ कोलविझ या बाईच्या चित्रांचें प्रदर्शन भरविण्याची त्याची मनीषा, ज्याला चीनचा 'गोर्की' म्हणतात त्या, ' लू-सीन् ' या ग्रंथकारानें शांघायमध्यें प्रदर्शन भरवून पार पाडली. या नव्या कलेचा उपयोग क्रांतिकारक आज फार मोठ्या प्रमाणावर करून घेत आहेत. लोकांची दारुण स्थिति आणि त्यांच्या महत्त्वाकांक्षा अगदीं सोप्या तऱ्हेनें या चित्रांतून दाखविल्या जातात आणि जनता जागृत केली जाते. वर्तमानपत्रांतून व मासिकांतून हीं चित्रें येण्यास चंग-कै-शेकच्या सरकारनें बंदी केली तरी तीं स्वतंत्रपणें हजारोंनीं वांटलीं जात.

मूळच्या वैचारिक कलेला क्रांतीनें करून दिलेली वाट आतां कलेला लढाऊ वातावरणांत नेऊन ठेवूं लागली आहे. जनतेच्या दृष्टीनें हीच कला अधिक उपयुक्त ठरेल.

या आधुनिक कलेंतील एक नमुना माझ्या पाहाण्यांत आला. खालच्या समाजाला सुखाचा दिवस कधीं दिसायचा नाहीं. नेहमीं दारिद्र्य; अंगावर कपडा कधीं धड मिळायचा नाहीं; जीवन कितीं कष्टाचें हें दाखवणारें तें चित्र होतें. लांकडावर खोदलेल्या कामावरूनच तें छापलेलें होतें. चित्र किचकट नव्हतें. अगदीं अडाण्याला समजण्याइतकें सोपें होतें. चित्रांत वस्तूंची किंवा माणसांची खेंच नव्हती. चित्रांत दोन स्त्रिया होता. एक म्हातारी लांकडाच्या ठोकळ्यावर बसली होती. कंबर वांकलेली. डोळ्याला चष्मा. अंगावरचे कपडे फाटलेले. मांडीवर दुसरें एक, फाटकें वस्त्र पडलें होतें. तें शिवण्याकरितां ती सुईंत दोरा ओवीत होती. या वयस्कर बाईच्या मागें एक तरुणी होती. तिच्याहि अंगावर फाटकें वस्त्र. तीहि आपल्या आजीप्रमाणें फाटके कपडे शिवीत बसली होती. गरीबांचें तारुण्य तसेंच म्हातारपण कसें जात असतें त्याचें हें वर्णन किती अचूक होतें !








श्री. गगनविहारी मेहता : अनु. प्रा. ग. ना. जोशी

# कला हें थोतांड आहे !

कोणत्याहि[1] विषयाची चर्चा करण्यापूर्वी त्याची व्याख्या प्रथम निश्चित करावी लागते. परंतु पहिली अडचण तर तेथेंच येते. 'भद्रंभद्रं' चें जीवन-चरित्र लिहिणाऱ्या अंबारामांनीं म्हटलें होतें त्या-प्रमाणें "काय आहे व काय नाहीं हा एवढा कठिण विषय आहे कीं, अमुक आहे व अमुक नाहीं हें सांगण्याची महापंडितांशिवाय कोणाची हिंमत चालत नाहीं." याचप्रमाणें कला काय आहे व काय नाहीं याचा निर्णय करणें तितकेंच कठिण आहे. कोणत्या कृतीस, केव्हां व कशासाठीं कलाकृति म्हणावयाचें याविषयीं कलावन्त, विवेचक, नियतकालिकांचे संपादक व वर्तमानपत्रांचे नि नियतकालिकांचे लेखक या सर्वांच्यामध्यें इतके मतभेद आहेत कीं, त्यांत आपणांसारखीं सामान्य माणसें गोंधळून जावीत यांत काय आश्चर्य ! कशाला कला म्हणावें यापेक्षां कोणास कलावन्त म्हणावें याविषयीं अधिक तीव्र मतभेद होत असतात. कलेच्या व्याख्येपेक्षां कला-वंताची व्याख्या करणें अधिक कठिण असते. कारण कलावन्त निर्मील ती कला असें अनेक लोक समजतात असें दिसून येतें. परंतु सर्वांना मान्य असा कलावन्त मिळणें कठिण आहे. म्हणून त्याचा शोध करणें सोडून द्यावें.

कलेचा सौंदर्याच्या सृष्टीशीं संबंध असतो असें आपण मानतों. चित्र, संगीत, स्थापत्य, शिल्प, साहित्य—हीं सर्व कलेचीं अंगें आहेत; कलेचीं क्षेत्रें आहेत. जीवनाहून कांहीं निराळी, जीवनाशीं ज्याचा कांहीं संबंध असणार नाहीं ती कला, असें अनेकांना वाटतें. सुंदर वस्तू उपयोगाकरितां नसून उपभोगांसाठीं असतात असें समजण्यांत येतें. कला म्हणजे आभूषणाची, बाह्य अवडंबराची वस्तु ! चित्रें टांगल्याशिवाय का आपण जगूं शकत नाहीं ? उच्च स्वरानें गायिल्याशिवाय का आपण पैसे कमावूं शकत नाहीं ? सुंदर मंदिरें किंवा मूर्ती पाहिल्याशिवाय का आपणांस पुढें जातां येत नाहीं ? चांदणी रात्र, आकाशांतील असंख्य तारे, उषा नि संध्या या सर्वांचा काय उपयोग आहे ? यांची अवगणना करून सत्ता नाहीं का मिळवितां येत ? त्यांच्याशिवाय लाखों रुपये मिळवितां येतातच ना ! तर मग कला खरोखरच आवश्यक आहे का ? किती माणसांना तिची खरी भूक, खरी तहान असते ? कलेविषयींच्या प्रत्येक व्याख्यांनात व लेखांत "साहित्य—संगीत—कला-विहीन मनुष्य हा शेपूट नसलेल्या पशूप्रमाणें असतो" अशा अर्थाचा जुना श्लोक नेहमीं वापरतात. जसें स्त्रीशिक्षणाच्या भाषणांत नेपोलिअनचा दोहरा अनिवार्य असतो तसेंच कलेवरील चर्चेत या श्लोका-शिवाय चालत नाहीं. तरी पण शेपटाचा कलेशीं काय संबंध असतो हें अजूनहि मला समजलें नाहीं ! त्याचप्रमाणें कलेनें आच्छादिलेली व न्हालेली किती तरी माणसें पुच्छविहीन पशूपेक्षांहि अधम आहेत, त्याचें काय ?

---

१ सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ श्री. गगनविहारी मेहता यांनीं नभोवाणीवरून 'कला एक तूत छे' असें भाषण केलें. तें 'संस्कृति' या मासिकांस प्रसिद्ध झालें. त्याचा प्रस्तुत लेख हा अनुवाद आहे. श्री. मेहता यांच्या शैलींतील उपरोध व व्याजोक्ति वाचकांना हृदयंगम वाटतील, असा विश्वास आहे.— अनुवादक.








सौंदर्याची भावना, सौंदर्याची प्रतीति कांहीं सर्व माणसांत नसते. गाढवापुढें गीता वाचण्याइतकेंच कलेविषयीं अज्ञानी असलेल्या माणसापुढें कालिदासाचें 'शाकुन्तल' वाचणें निरर्थक असतें. सौंदर्य ओळखण्याची शक्ति सर्वांमध्यें असती तर, आपलीं शहरें व खेडीं अशीं विकृत व घाणेरडीं असतीं कां? आपलीं घरें व आपले रस्ते इतके कुरूप व बेडौल असते का? दुकानांत व बैठकींत जीं अनुपम चित्रें व तसबिरा लावण्यांत येतात तीं दिसतीं कां? नाहीं. सौंदर्याची भावना स्वाभाविक (नैसर्गिक) नसते, कृत्रिम असते. माणसानें ती शिकविली आहे. संस्कृतीचें तें चिह्न आहे.

पुनः कोणी म्हणेल कीं कला आनंदाचें साधन आहे. कोणाच्या आनंदाचें, कोणत्या प्रकारच्या आनंदाचें—असे प्रश्न तर चटकन् विचारतां येतील. कलावंताच्या स्वतःच्या आनंदासाठीं असेल तर ती आत्मलक्षी कला आहे, Art for Art's sake आहे, लोकांकरिता नाहीं, म्हणून ती 'प्रगतिशील' समजली जाणार नाहीं असें विवेचक म्हणतील. पूर्वीं राजे, श्रीमंत लोक हे कलेचे भोक्ते व कलावंतांचें पोषण करणारे. त्यांच्यासाठीं कला निर्मिली जात असे. अशी कला लोकसत्तेच्या या युगांत कशी स्वीकारली जाणार? भविष्यकाळांत तर कोणत्या रीतीनें, केव्हां व किती आनंद कोणी घ्यावयाचा हें सर्व नक्की ठरविण्यांत येईल. 'निर्दोष' आनंदच निर्मिण्याची परवानगी मिळेल व कोणत्या आनंदास 'निर्दोष' म्हणावयाचें यासाठीं नियम तयार करण्यांत येतील. कोणत्या प्रकारची थट्टामस्करी व विनोद करावयाचे व कोणत्या मस्करीच्या वेळीं हंसावयाचें याचे पण कायदे होतील. कला कोठें कायद्याच्या पलीकडे असते!

कलेशिवाय जगतां येणार नाहीं असें थोडेंच आहे! कलामय वृत्ति किंवा प्रवृत्ति नसतांना असंख्य माणसें आयुष्य घालवीत आहेत, त्यांना थोडीच कलेची उणीव भासते? इतकें साहित्य निर्माण न होतें, इतके कवी, चित्रकार, शिल्पकार जन्माला न येते तर मनुष्याच्या नित्याच्या जीवनांत, व्यवहारांत, वर्तनांत कांहीं फरक पडता का? अद्यापीहि कालिदास, टागोर किंवा नानालाल यांचीं नांवें न ऐकतां व न जाणतांहि जे जगत आहेत त्यांचें जीवन का त्यामुळें क्षुद्र, अविचारी व अपूर्ण असतें! जे नवलकथा व नाटकें वाचतात, चित्रांच्या उत्कृष्टतेची पारख ज्यांना करतां येते या सर्वांचेंच जीवन यामुळें अधिक उन्नत होतें का? कलेंत निपुण असलेले विद्वान् व कलेनें ओथंबलेले कलावंत स्वतः कित्येक वेळां स्वार्थी, भांडखोर व ईर्ष्याखोर नसतात का? त्यांनीं निर्मिलेल्या पात्रांतून, त्यांच्या काव्यपंक्तींतून आपणांस प्रेरणा मिळवावयाची असते. त्यांच्या स्वतःच्या चारित्र्यांतून किंवा उच्च जीवनांतून नव्हे. कलेमुळें मनुष्य कितीसा उच्चतर झाला आहे? उच्च होऊं तरी शकतो का? कदाचित् कलेच्या दृष्टीनें हा प्रश्न अस्थानीं असेल. कलेचे उपासक तर म्हणतील कीं कवि स्वच्छंदी असावा, चित्रकारानें आपलें कर्ज परत करूंहि नये, गवयानें गांजा प्यावा! या सर्वांना आपला कलेशीं कांहीं संबंध नाहीं असें वाटतें. त्यांच्या या मस्तींतून कला उद्भवते; त्यांचीं व्यसनें किंवा वाईट संवयी यांमुळें त्यांना प्रेरणा होते व कल्पना तीव्र होते! तर मग ज्या कलेचा जीवनाशीं संबंध नाहीं, जी कला आपल्या निर्मात्याच्या जीवनावरहि परिणाम करूं शकत नाहीं ती कला काय कामाची? अशा कलेला थेतांडच नाहीं तर काय म्हणावयाचें!

पुनः कलेंत कांहीं प्रमाण, कांहीं नियम असतात कीं नाहींत हा पण एक प्रश्नच आहे. बर्नार्ड शॉच्या भाषेंत म्हणायचें तर कलेंत खरा नियम असा एकच असतो तो म्हणजे कलेला कांहीं नियम नसतो (The golden rule is that there are no golden rules)! कलेचें परीक्षण व विवेचन बघाल तर समजेल कीं, महान् कलावंत स्वतःच स्वतःचे नियम तयार करीत असतो; स्वतःच कलेचें प्रमाण घडवीत असतो. ज्याप्रमाणें गणितांत एक व एक मिळून दोन होत असतात, तसा कलेंत कांहीं स्पष्ट नियम किंवा पद्धति नसते, कीं जिचें उल्लंघन झाल्यास कलाकृतीला कलाकृतिच म्हणावयाचें नसतें. नवे छंद निर्मिले जातात, मुक्तछंदांत काव्यें लिहिलीं जातात, ओबडधोबड चित्रें रंगविलीं जातात! तर मग कलेंत रूढि किंवा परंपरा कोठली असणार? भवभूतीला का नाट्यशास्त्राचा अभ्यास करावाच लागला असेल! ज्याप्रमाणें शिकल्यानें कांहीं कवि








# कला हें थोतांड आहे !

होतां येत नाहीं किंवा इतिहासाचीं पुस्तकें वाचून ऐतिहासिक पुरुष होतां येत नाहीं, किंवा राज्यनीतीचे पाठ शिकल्यानें राजकारणी पुरुष बनतां येत नाहीं, त्याप्रमाणें कलेचीं पुस्तकें घोकल्यानें कलावंत बनतां येत नाहीं. माझा एक मित्र म्हणावयाचा कीं, टागोरांप्रमाणें विचार व कल्पना तर आपणांसहि स्फुरतात ! पण त्यांना मात्र ती लिहिण्याची हातोटी साधून गेली होती ! खरी गोष्ट तर हीच आहे. सर्वच हातांत पेन्सिल व टाक घेऊं शकतात. पण त्यानंतर विचार स्फुरण्याचीच अडचण असते. प्रत्येक कलावन्त निरनिराळ्या रीतींनीं विचार प्रकट करीत असतो. म्हणूनच कलेंत कांहीं ठराविक नियम नसतो.

आणि अशी कांहीं पद्धति नसल्यानें कला 'आत्मलक्षी' कीं 'परलक्षी' असते, कलेला हेतु असतो कीं नसतो, असला तर कोणता असावा यांची चर्चा निरंतर होत असते. केवळ आल्हादासाठीं, स्वतःच्या मनोरंजनासाठीं कलानिर्मिति व्हावी हें आतां कोण मान्य करणार ? तरीहि आपणांस वाटेल ती कला होय व जी वाटणार नाहीं ती कला नव्हे हें खरें असलें तर कलेचें विवेचन तरी कोणत्या रीतीनें होऊं शकणार ? ह्याचा निकाल कोणी लावावयाचा ? एखादें चित्र चांगलें आहे कीं नाहीं, हें ठरविण्यासाठीं कला न समजणाऱ्यांचा एक पंच असावयास पाहिजे. "न समजणारा" अशाकरितां हवा कीं जाणणारीं माणसें पक्षपात करतात; दुराग्रही असतात. म्हणून अज्ञानी माणसें निःपक्षपाती असण्याचा संभव असतो !

चांगली व वाईट कलाकृति यांच्यांतील फरक मला तरी बहुतकरून समजतच नाहीं ! म्हणून हल्लीं तर कलेचें परीक्षण वाचूनच मी प्रदर्शन पहावयास जातों. तें अशाकरितां कीं यांतून कोणतें चित्र बघायचें हें कळावें ! जेथें मोठें टोळकें जमा झालेलें असतें तेथें मीहि उंच मान करून तें चित्र किंवा तो पुतळा प्रशंसेच्या दृष्टीनें पाहूं लागतों. ज्या गायनांत सर्व माना डोलवितात त्यांत मीहि तसेंच करतों. जीं काव्यें मुळींच समजत नाहींत तीं फार गहन असल्यानें समजत नाहींत असें मानून त्यांची स्तुति करतों ! कारण कलेची पद्धति व नियम कोणते हें कोण निश्चित करूं शकलें आहे ! बाकी कित्येक आकृती चित्रें आहेत कीं नाहींत, व असलीं तर तीं कशाचीं आहेत हेंहि मला समजत नाहीं. श्री. ज्योतींद्र दवे म्हणतात कीं, ते शाळेंत असतांना अशीं sur-realistic चित्रें काढावयाचे. पण त्यांच्या चित्रकलाशिक्षकानें अशीं वाईट चित्रें काढल्याबद्दल त्यांना शिक्षा केल्या होत्या. तेव्हांपासून त्यांची चित्रकलेंतील शक्ति कमी होत गेली व शेवटीं नाहींशी होऊन गेली ! यावरूनच दिसतें कीं, सृजनशक्तिच काय, पण कला ओळखण्याचें ज्ञानसुद्धां किती कमी आहे, किती थोड्या माणसांत तें असतें ! कला जणूं कांहीं नाहींच !

प्लेटो म्हणतो कीं, श्रोत्यांत व प्रेक्षकांत एक प्रकारचा दैवी उन्माद कलेनें उद्भवत असतो. या उन्मादाला 'मस्ती' म्हणा, 'उत्साह' म्हणा ! पण एक प्रकारच्या वेडाशिवाय वा लहरीशिवाय कला निर्माण होत नाहीं व तिचा उपभोगहि मिळत नाहीं. शहाण्या माणसानें या वेडाला उत्तेजन देऊं नये. नेहमीं तें सोडून द्यावें ! कारण जसजसे आपण कलेचे शौकीन होत आहोंत तसतसे जीवनापासून अलग होत आहोंत ! दया करण्याऐवजीं तिच्यावर काव्य आपण लिहूं, प्रेम अनुभवण्याऐवजीं त्याच्यावर आपण गोष्टी लिहूं, सूर्यास्त पाहण्याऐवजीं सूर्यास्ताचीं चित्रें पाहण्यास जात जाऊं, तर आपलें जीवन व जग यांतील अंतर वाढतच जाणार ! अशी कला ही जीवनाचा आसरा होण्याऐवजीं त्याला झाकणारें त्याचें आच्छादन होत असतें. कला जीवन व्यक्त करीत नसते, तर जीवनावर पडदा टाकीत असते ! अशी कला एक थोतांडच नव्हे का ?

---








श्री. केदारनाथ

# म. गांधी : कांहीं आठवणी

सन एकोणीसशें नऊ किंवा दहाच्या प्रारंभीं मला आतां नक्की साल आठवत नाहीं—आम्ही दोन-चारजणांनीं महाड येथें माझे स्नेही श्री. गोविंदराव टिपणीस यांचेकडे कर्मवीर गांधी यांची 'हिंद-स्वराज्य' ही लहानशी पुस्तिका त्यांत दिलेल्या विचार-सरणीवर चर्चा करीत वाचून काढली. ती वाचीत असतां त्यांतील विचारांचा आमच्या सर्वांच्या मना-वर एक नवीनच प्रकाश पडूं लागला. त्या काळीं ज्या लोकांचा देशाच्या गुप्त किंवा प्रकट चळवळींत मनःपूर्वक संबंध होता, त्यांपैकीं आज जे हयात असतील त्यांना आठवत असेल, कीं ते दिवस राज-कारण व देशकार्य यांच्या दृष्टीनें किती बिकट होते ! ' हिंदस्वराज्यां'तील विचारसरणी एक नवीन प्रकारचा देशसेवेचा मार्ग दाखवणारी असल्यामुळें कांहीं निराश अंतःकरणांना तींतून आशेचे किरण दिसूं लागले. मला ते विचार बरे वाटले. परंतु तत्कालीन परिस्थितींत ते अमलांत कसे आणावयाचे याबाबत मी तेव्हां तरी फार विचार केला नाहीं. कर्मवीर गांधींच्या आफ्रिकेंत चाललेल्या चळवळींबद्दल मधून मधून जी माहिती मिळे, तीवरून एखाद्या सात्त्विक वृत्तीच्या देशभक्ताबद्दल जसा आदर वाटावा तसा आदर त्यांचेविषयीं माझ्या मनांत उत्पन्न झाला. परंतु हा पुरुष पुढें केव्हां तरी भारताचा सर्वमान्य पुढारी होऊं शकेल अशी त्या वेळीं मला कल्पनाहि आली नाहीं. माझें मन त्या काळीं छत्रपति शिवाजी व समर्थ रामदास यांच्या स्वराज्यविषयक कल्पनांनीं, त्यांच्या विचारसरणीनें व स्वराज्यप्राप्तीच्या साधन-मार्गांनीं भरलेलें होतें. त्यांत कोणताहि नवीन विचार ग्रहण करण्यास किंवा ठेवण्यास त्या वेळीं अवकाशहि नव्हता.

## १९१५ च्या कुंभमेळ्यांत पहिलें दर्शन

त्यानंतर कांहीं काळानें स्वातंत्र्याच्या आमच्या प्रयत्नांत मी निराश झाल्यावर १९११ पासून साधनेच्या निमित्तानें मी तीन वेळां एकान्तवासांत हिमालयाच्या बाजूला गेलों. तिसऱ्या खेपेला १९१५ सालीं कुंभमेळ्याच्या वेळीं मीं तिकडे जाण्याचें ठरविलें. त्या मेळ्याच्या प्रसंगीं हिंदुस्थानांतील व हिमालयां-तील हजारों साधूसंत तेथें एकत्र होत असतात. त्यांतूनच एखाद्या श्रेष्ठ महात्म्याचें दर्शन होऊन त्याचे-कडून देशोद्धाराचा खरा मार्ग सांपडेल हा त्या वेळीं तिकडे जाण्यांत माझा उद्देश होता. मी तिकडे जाण्यास मुंबईहून निघालों तों त्या गाडींतच अला-हाबादच्या सेवासमितीच्या मार्फत काम करण्याकरितां म्हणून जाणारी ' सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटी '-मधील ओळखीची कांहीं मंडळी, त्याचप्रमाणें खान-देशांतून तिकडे जाणाऱ्या ओळखीच्या स्वयंसेवकांची तुकडी भेटली. माझा कुंभमेळ्यांत जाण्याचा हेतु व त्या सर्व मंडळींचा हेतु हे अगदीं निरनिराळे होते. तरी त्यांनीं मला आपल्या कॅम्पमध्येंच राह-ण्याचा व आपल्याला साहाय्य करण्याचा आग्रह केल्यामुळें मला त्यांच्यांतच रहावें लागलें. ती सर्व मंडळी तिकडे अगदीं अपरिचित होती व मी या बाजूला पूर्वीं दोन वेळां जाऊन आलों असल्यामुळें त्यांच्यापेक्षां तिकडील स्थितीविषयीं मी अधिक माहीतगार होतों. याच कारणामुळें त्यांनीं मला तसा आग्रह केला. मलाहि सेवाकार्याची आवड असल्यामुळें मीं तें काम टाळलें नाहीं. त्यांना मदत करून महात्म्याच्या शोधाचें काम आपण करूं व आपला मुख्य हेतु सिद्धीस नेऊं शकूं असें वाटलें. परंतु अनुभव उलट आला. त्या सालीं बारा लाख

यात्रा त्या पर्वकाळीं जमली असावी असा अंदाज होता. हिंदुस्थानांतून अनेक ठिकाणांहून सेवाकार्या-करितां स्वयंसेवक आले होते. तरी ते अपुरे पडले. मला कँपमध्येंच रहावें लागे. सर्व दिवस यात्रे-करूंना साहाय्य करण्यांत जाई. यात्रा पुरी होतां होतां तेथें भयंकर कॉलरा उठला. काम अतोनात वाढलें. कित्येक कामें माझ्यावरच पडली. माझ्या स्वतःच्या कामाकरितां मला वेळ मिळेना. आमच्या-करितां तंबू उभारले होते. आम्ही रहात होतो त्याच्या एका बाजूच्या तंबूंत पं. हृदयनाथ कुंझरू उतरले होते व दुसऱ्या बाजूच्या तंबूंत कर्मवीर गांधी व दक्षिण आफ्रिकेंतून त्यांच्याबरोबर आलेल्या परि-वारापैकीं कांहीं मंडळी उतरली होती. त्या ठिकाणीं त्यांचा मुक्काम ३-४ दिवस असावा. ते हिंदुस्थानांत आल्यापासून त्यांच्या विषयीं माहिती व्हावी अशी माझी इच्छा होती. शेजारच्याच तंबूंत ते उतरले असल्यामुळें मला आनंद झाला. आम्ही कित्येकजण रोज रात्रीं तेथें जाऊन बसत असूं. त्या वेळीं प्रार्थ-नेचा प्रघात पडला नव्हता. ते सफाईसंबंधीं व सेवाकार्याविषयीं कांहीं सांगत असत. एके दिवशीं सायंकाळनंतर त्यांचें कॅम्पच्या मंडळींकरितां भाषण झालें. त्याचा विषयहि ' सफाई व सेवाकार्य ' हाच होता. जुन्या काठेवाडी पोशाकांत ते त्या वेळीं असत. ते हरिद्वारहून निघाले तेव्हां स्टेशनवर बरो-बर गेलेल्या मंडळींत मी होतों. या प्रसंगीं त्यांच्याशीं बोलण्याचा प्रसंग मला आला नाहीं. त्यांच्या साध्या व सात्विक राहणीचा त्याचप्रमाणें त्यांच्या देशाभिमाना-चा परिणाम माझ्या मनावर कांहीं अंशीं झाला. परंतु त्यांचा व त्यांच्या बरोबरच्या मंडळींचा फलाहाराचा परिपाठ पाहून मला वाटलें कीं, हिंदुस्थानच्या दारि-द्र्याची खरी कल्पना यांना अजून झाली नसावी. नाहीं तर आर्थिक दृष्ट्या पुष्कळ महाग पडणारा फलाहार त्यांनीं हिंदुस्थानांत चालूं ठेवला नसता ! हरिद्वाराला कॉलरा फार वाढला व यात्राहि समाप्त झाली. म्हणून मी तेथून गुरुकुल कांगडी-मध्यें कांहीं दिवस जाऊन राहिलों व तेथून परत महाराष्ट्रांत आलों. अशा रीतीनें कोणा महात्म्याची भेट किंवा दर्शन न होतांच मला परत यावें लागलें.

ही कथा इतकी सविस्तर देण्याचें कारण म. गांधींचा देहान्त झाल्यावर मी त्यांच्या व माझ्या संबंधाचा प्रथमपासून विचार करूं लागलों. तेव्हां हरिद्वारला कुंभमेळ्यांत मी त्यांना प्रथम पाहिलें त्या गोष्टीची आठवण होऊन मला वाटलें कीं, कर्मवीर गांधी म्हणून ज्या व्यक्तीपुढें आम्ही रोज जाऊन बसत होतों, तीच व्यक्ति देशोद्धार करणारा खरा महात्मा निघाली ! तीच व्यक्ति थोड्या काळांत सर्व जगांत ' महात्मा ' म्हणून प्रसिद्ध होणार आहे याची त्या वेळीं मला कल्पनाहि आली नाहीं, याचें मला विलक्षण आश्चर्य वाटलें. कुंभमेळ्यांत मी ज्या हेतूनें गेलों होतों तो माझा हेतु खरोखर सफळ तर झालाच होता; परंतु मला मात्र त्याचें ज्ञान नव्हतें ! तें ज्ञान त्यांच्या निर्वाणानंतर मला झालें.

## चारित्र्याचें शिक्षण देणारा देशभक्त

१९१६ मध्यें गांधीजींनीं अहमदाबादजवळ कोचरब गांवीं ' सत्याग्रहाश्रम ' या नांवाची संस्था स्थापन केली. माझे मित्र काकासाहेब कालेलकर यांचा व म. गांधींचा तोंपर्यंत बराच संबंध वाढलेला होता. त्यांच्या मार्फत मी आश्रमांत थोडे दिवस राहण्याची इच्छा दर्शविली व महात्माजींनीं मला राहण्याची परवानगी दिली. आश्रमांत सर्वजण त्यांना ' बापूजी ' म्हणत असत. तेथील नियमावलींत सत्य, ब्रह्मचर्य आदि पंचमहा-व्रतांवर व त्याबरोबरच स्वदेशीवर भर असल्यामुळें आश्रम व बापूजी यांचेविषयीं अधिक जाणण्याची मला उत्कट इच्छा होती. लहानपणापासून देशकार्या-कडे मनाचा ओढा असल्यामुळें अनेक देशभक्तांशीं माझा संबंध आला होता. परंतु पंचमहाव्रतांवर त्यांच्या इतका भर देणारा व स्वतःच्या मुलांनाहि चालूं शिक्षण न देतां चारित्र्याचें शिक्षण देणारा देशभक्त मला माहीत नव्हता. माझें मन जिज्ञासा-बुद्धीनें का होईना, परंतु जें त्यांच्याकडे प्रथम आक-र्षित झालें तें त्यांची साधुता पाहूनच झालें. त्या सालीं मी थोडेच दिवस आश्रमांत राहिलों. परंतु तितक्या वेळांत, आश्रमांतील काम करतां करतां, केव्हां त्यांच्याबरोबर फिरायला जात असतां—अनेक बाबतींत त्यांच्याशीं चर्चा करायला मिळाली. विशेषतः



अनुक्रमणिका





खानपान, औषधांचा उपयोग, अहिंसा या विषयांवर आमचें बोलणें झाल्याचें मला आठवतें.

त्या वेळीं बापूजी म्हणत, "दूध हा मनुष्याचा खुराकच नाहीं. कोणत्याहि प्राण्याचें दूध प्यावयाचा मनुष्याचा अधिकार नाहीं. दूध पोटीं येणाऱ्या संतानाकरितां असतें. आपण बलवान् असल्यामुळें आपल्या स्वार्थाकरितां प्राण्याचें दूध काढून आपण त्याचा उपयोग करतों, हें आपण पाप करतों. त्यांचेवर आपण हा अन्याय करतों. शिवाय दूध हा प्राणिज खुराक असल्यामुळें शाकाहाराच्या दृष्टीनें तो निषिद्ध आहे. ब्रह्मचर्याला तो बाधक आहे, म्हणून ब्रह्मचर्याचा आग्रह राखणारानें तो मुळींच घेऊं नये. मनुष्याला त्याची खरोखर आवश्यकताहि नाहीं. घोडा, बैल हे प्राणी आपल्याप्रमाणें दूध पीत नाहींत तरी ते निरोगी व बलवान् असतात" अशा पद्धतीवर त्यांचें या विषयांतील प्रतिपादन असे. त्या वेळीं दूध किंवा त्यापासून बनणारी कोणतीहि वस्तु आश्रमांत उपयोगांत आणली जात नव्हती. परंतु त्याचा परिणाम सर्वांवर वाईट होत असल्याचें थोड्याच दिवसांत दिसून आल्यावरून बापूजींनीं पुढें दूध, ताक वगैरे सर्वांना देण्याचें सुरू केलें. मिठाचीहि माणसाला अवश्यकता नाहीं असें त्यांचें मत होतें व औषधांच्या बाबतींत तसाच आग्रह होता. अहिंसेविषयींचे त्यांचे विचार जगजाहीर आहेत. प्रत्येक बाबतींत माझी मतभिन्नता सांगून मला त्यांच्याशीं चर्चा करण्याची संधि मिळाली आहे. ती चर्चा प्रश्नोत्तर रूपानें येथें दिल्यास लेख प्रमाणाबाहेर वाढेल म्हणून मी येथें देत नाहीं.

### परम आदर वाटला
### पण भक्ति निर्माण झाली नाहीं

१९१७ सालीं मी कांहीं दिवस पुनः कोचरबला जाऊन राहिलों. त्या सालीं वैशाख पौर्णिमेच्या दिवशीं आश्रमांत राष्ट्रीय शाळा सुरू केली. त्या वेळीं मीं तेथें होतों. तेव्हां श्री. साखळचंद शाह शाळेचे मुख्याध्यापक नेमले होते. व श्री. नरहरीभाई, काकासाहेब वगैरे मंडळी शिक्षक होती. श्री. महादेवभाई अजून तेथें दाखल झाले नव्हते. श्री किशोरलाल भाई थोड्या दिवसांनंतर येऊन शाळेला मिळाले. श्री. मामा फडके त्या वेळच्या शिक्षकांत होते, असें आठवतें.

त्या खेपेला हातसुताच्या बाबतींत माझें व पू. बापूजींचें बोलणें झालें. वसई येथील यंत्रकार व चित्रकार श्री. मराठे यांच्या तयार होत असलेल्या सुताच्या यंत्राची माहिती मीं त्यांना दिली व त्या यंत्राच्या बाबतींत कांहीं प्रयत्न व्हावा असेंहि त्या वेळीं ठरलें. परंतु कांहीं कारणामुळें ती गोष्ट त्या वेळीं घडून येऊं शकली नाहीं. परंतु १९२७ कीं २८ सालीं, मी मराठे यांस साबरमती आश्रमांत सुताचें यंत्र तयार करण्याकरितां म्हणून बापूजींच्याजवळ ठेवलें. आश्रम प्रथम कोचरबला होता. त्यानंतर ३-४ वर्षांनीं तो साबरमतीस आला. तेव्हां त्या काळांतील तेथील मंडळींची राहणी पाहून बहुजनसमाजाचें मन अत्यंत चकितपणें त्याकडे वेधलें. तेथील सर्व कामें आश्रमांतील मंडळींनाच करावीं लागत. चाकरनोकरांचा कांहीं संबंध नव्हता. दळणें, स्वयंपाक करणें, पाणी भरणें, भांडीं घासणें इतकेंच नव्हे तर संडास साफ करणें यांसारखींहि कामें शिक्षित व विद्वान् माणसें करीत असलेलीं पाहून सर्वांस आश्चर्य वाटे. त्याबरोबरच देशाविषयींची त्यांची कळकळ पाहून बापूजी व आश्रमवासियांच्याविषयीं सर्वांस विलक्षण आदर वाटे. त्याच सुमारास चंपारण्याची चळवळ निघाली होती. त्यामुळें बापूजींचें नांव सर्वत्र झालें होतें. माझें जीवन सर्व प्रकारचीं शारीरिक कामें करण्यांत पूर्वीपासून गेलें असल्यामुळें व माझ्या त्या वेळच्या विशिष्ट मनःस्थितीमुळें, आश्रमांतील राहणीविषयीं मला आश्चर्य वाटलें नाहीं. तेथील वैराग्ययुक्त देशसेवेच्या विचारांचा माझ्या मनावर परिणाम अद्भुतसा झाला नाहीं. अनेक वर्षांपासूनच्या माझ्या आध्यात्मिक साधनेनें माझ्या मनाला कांहीं शान्ति वाटूं लागली होती. म्हणून त्या समयीं बापूजींच्या अध्यात्मविषयक विचारांत मला कांहीं नवीन किंवा आकर्षक असें वाटलें नाहीं. पण त्यांची चारित्र्यशीलता, आध्यात्मिक ध्येयाविषयींची त्यांची उत्कंठा, देशविषयक इतकेंच नव्हे तर मानवजातीविषयींचें त्यांचें प्रेम, सत्यावरील त्यांची निष्ठा, त्याकरितां व स्वातंत्र्याकरितां त्यांनीं अविरतपणें चालविलेला शुद्ध कर्मयोग, तो आचरीत असतां त्यांची सहिष्णुता, त्यांची धडाडी व धैर्य, समजूत-उमजून संतोषपूर्वक तुरुंगवास सोसण्याची










त्यांची तयारी वगैरे अनेक सद्गुणांमुळें माझ्या मनांत त्यांच्याविषयीं फारच आदर उत्पन्न झाला. परंतु जीवनसर्वस्व त्यांना अर्पण करावें असा भाव माझ्या मनांत उत्पन्न झाला नाहीं. लहानपणापासून माझें जीवन कांहीं अंशीं साहसी विचारांत गेलें असल्या-मुळें भावनातिशयित्वाचे अनेक प्रसंग व अनुभव मला पूर्वीं येऊन गेले होते व पुढें मानसिक साधनेनें मनाला स्थिरताहि आलेली होती. विवेकशीलता वाढली होती. अशा अनेक कारणांमुळें कोणाहि व्यक्तीविषयीं अमर्याद भावना उत्पन्न होईल अशी माझी मनःस्थिति राहिली नव्हती. त्यामुळें बापूजींविषयीं मनांत परम आदर वाटत असूनहि भक्ति निर्माण झाली नाहीं, असें मला वाटतें. १९२० सालच्या असहकाराच्या चळवळींत त्यांनीं अनेक बहिष्कार पुकारले. त्यांतच शिक्षणा-वरहि त्यांनीं बहिष्कार पुकारला. देशहिताच्या दृष्टीनें चालू शिक्षणांत कांहीं अर्थ नाहीं हें समजून मी त्यांच्यापूर्वीं वीस वर्षें, १९०१ सालीं कोणी साथीदार नसतां एकट्यानें स्वतःच्याच मतानें शिक्षण सोडलें होतें. अशा प्रकारच्या माझ्या जीवन-क्रमामुळें मला त्यांच्या विचारांत, भावनांत व आचारांत भव्यता वाटली, पण नवीनता वाटली नाहीं. शिवाय कांहीं कांहीं बाबतींत त्यांचे विचार अतिशयितेचे वाटत असल्यामुळें ते मला एकांगी वाटत होते. त्या विचारानें समाजांत एकदम सुधारणा न होतां, कांहीं अंशीं दिशाभूल व कांहीं अंशीं दंभ वाढण्याचाहि संभव मला वाटत होता.

इतकें असूनहि बापूजींनीं जेव्हांपासून प्रत्यक्ष राजकारणांत प्रवेश केला तेव्हांपासून आपल्या विचारानें व आचारानें, आपल्या स्पष्टोक्तीनें व निर्भय-तेनें त्यांनीं सर्व बाजूंनीं निराश झालेल्या आपल्या समाजांत जें चैतन्य संचरविलें तें अद्भुत होतें. त्या-वेळच्या खऱ्या स्थितीची कल्पना, ज्या लोकांनीं आपलें जीवन देशाकरितां अर्पण केलें होतें, पण देशकार्याचा किंवा स्वातंत्र्यप्राप्तीचा कांहीं मार्ग सुचत नसल्यामुळें जे रात्रंदिवस तळमळत होते, त्यांनाच होणार आहे. हताश झालेल्या सहस्रावधि लोकांच्या हृदयांत महात्माजींनीं आपल्या प्रभावानें दिव्य आशा निर्माण केली. प्रत्यक्ष लोकसेवेचीं अनेक कामें सुरू केलीं. नवीन प्रकारचा आचार धर्म निर्माण केला. राष्ट्रव्यापी आंदोलनें उठविलीं. जेल, पोलिसांचा मार यांचें भय नाहींसें केलें. अज्ञानी, अशिक्षित, स्त्रिया, मुलें—सर्वांच्या हृदयांत देशविषयक भाव जागृत केला. अगदीं थोड्या काळांत सारा हिंदुस्थान भेदभावरहित बुद्धीनें खडबडून जागा होईल, आपल्या कमजोर पायावर उभा राहाण्याचा प्रयत्न करील अशी त्यापूर्वीं कोणाला कल्पनाहि आली नसेल. ही जादू, ही किमया करण्याची पात्रता महात्माजींशिवाय दुसऱ्या कोणांतच नव्हती. दुसऱ्या कोणांतहि तें सामर्थ्य नव्हतें. त्या काळच्या मोठमोठ्या पुढाऱ्यांना एकत्र आणण्याची शक्ति दुसऱ्या कोणांतहि नव्हती. ही त्यांची करामत खरोखर अपूर्व होती व म्हणूनच त्यांना सर्वांनीं राष्ट्रपित्याचा मान दिला आहे तो अगदीं यथार्थ आहे. या त्यांच्या श्रेष्ठतेमुळें मला ते वंदनीय वाटूं लागले.

आश्रमवासी म्हणून मी आश्रमांत कधींहि राहिलों नाहीं. परंतु आश्रमांत माझा मित्रवर्ग वाढूं लागल्यामुळें माझें वर्षांतून जवळ जवळ सहा महिने आश्रमांत जात असत. त्या काळांत बापूजींशीं कारणपरत्वें चर्चेचे प्रसंग येत. विशेषतः जेव्हां जेव्हां मानसिक, धार्मिक किंवा आध्यात्मिक स्वरूपा-चा व्यक्तिगत अगर सामुदायिक असा एखादा प्रश्न निर्माण होई त्या त्या वेळीं बहुतकरून माझ्याशीं चर्चेचा प्रसंग येई. कर्मयोग, अहिंसा, नीतिविषयक आचार व निष्ठा, मंत्रविषयक विधिनिषेध, उपवास व स्वेच्छापूर्वक मृत्यु यांची धर्म्यता, लोकसंग्रह वगैरे वगैरे बाबतींत अनेक वेळां आमच्यांत चर्चा होण्याचे प्रसंग आलेले आहेत. राजकारणविषयक चर्चेचा प्रसंग राष्ट्रव्यापी आंदोलनाच्या वेळेशिवाय कधीं येत नसे. चालू व्यायामपद्धतीविषयीं बापू-जींच्या मनांत मुळींच आस्था नव्हती. कदाचित् तिच्याविषयीं अप्रीतिच असावी. परंतु त्या विषयांत माझ्याशीं त्यांची चर्चा झाल्यानंतर त्यांचें पहिलें मत बदललें व व्यायामाला रचनात्मक कार्यक्रमांत स्थान देणें आवश्यक आहे या निर्णयावर ते आले. हा त्यांचा विचार जाहीरपणें प्रकट होऊन त्याला राष्ट्रव्यापी असें मूर्त स्वरूप येण्यापूर्वींच '४२ चा








संग्राम सुरू झाला व त्यानंतर असल्या गोष्टीकडे लक्ष देण्यास त्यांना सवड मिळण्यापूर्वींच त्या महापुरुषाचा अंत झाला.

## क्षुद्रतेचा संपर्कही नव्हता

म. गांधींचा व माझा संबंध कसकसा येत गेला, मी त्यांच्याकडे कसा आकृष्ट झालों इत्यादींविषयीं कांहीं वैशिष्ट्यपूर्ण आठवणी मीं थोडक्यांत वर दिल्या आहेत. बापूजींच्या इतकें अपार चरित्र भूतकाळांतील किंवा वर्तमानकाळांतील कोणाहि राजकारणी किंवा धर्मप्रवर्तक पुरुषाचें नसेल. त्यांचें चरित्र अगाध आहे यांत शंका नाहीं. वैयक्तिक, कौटुंबिक, सामाजिक, राष्ट्रीय, धार्मिक व आध्यात्मिक वगैरे महत्त्वाच्या विषयांपासून तो आहार, निसर्गोपचार, स्वच्छता वगैरे अनेक प्रकारच्या विषयांवर विचार करून त्यांतील सुधारणांचीं अनेक कार्यें त्यांनीं सुरू केलेलीं असल्यामुळें त्यांचें जीवन इतकें विशाल झालें होतें कीं, त्याची आपल्याला यथार्थ कल्पनाहि होऊं शकत नाहीं. दक्षिण आफ्रिकेंतील त्यांच्या जीवनापासून सुरुवात केल्यास, त्यांच्याशीं संबंध आलेलीं अशीं हजारों माणसें सांपडतील, कीं ज्यांना त्यांच्या सज्जनतेचा साक्षात् परिचय झालेला आहे. त्यांच्याजवळ सतत राहणाऱ्या मंडळींइतका किंवा त्यांच्या एकनिष्ठ अनुयायांइतका माझा त्यांचा संबंध नव्हता. म्हणून त्यांच्या बाबतींत ती मंडळी जितकें जाणतात, त्या मानानें मी कांहींच जाणीत नाहीं. तरी त्यांचे जीवनविषयक जे मुख्य प्रश्न होते, त्यांचा जीवनविषयक जो आध्यात्मिक हेतु होता व ज्या चारित्र्यशीलतेकरितां ते रात्रंदिवस जागरूकपणें झटत होते, त्या सर्व गोष्टींशीं माझा पुष्कळच गाढ संबंध आलेला होता. त्यावरून माझी खात्री आहे कीं, त्यांचें समग्र जीवन जरी सामाजिक व राजकीय अशा एकापेक्षां एक महान् प्रसंगांनीं भरलेलें दिसत असलें तरी त्या सर्वांच्या मागें स्वतःच्या व लोकांच्या आध्यात्मिक उन्नतीचा व उन्नतीच्या द्वारें मानवी पूर्णतेचा व मोक्षाचा दृढ हेतु होता. त्यांच्या सर्व व्यवहाराच्या मागें एक प्रकारच्या उच्च हेतूची तळमळ होती, याविषयीं शंका नाहीं. त्यामुळेंच त्यांच्यांत कोणत्याहि प्रकारची क्षुद्रता वास करीत नव्हती. आपल्यापेक्षां कमी दर्जाच्या मनुष्याचाहि गुणाला योग्य महत्त्व देऊन त्याला पुढें आणून त्याचा सार्वजनिक हितकार्यांत उपयोग करून घेण्याची कला म्हणा कीं सद्गुण म्हणा त्यांच्या अंगीं होता ह्याविषयीं माझ्या स्वतःच्या व अनेकांच्या बाबतींत घडलेल्या त्यांच्या वर्तनावरून माझी खात्री झाली आहे. विरोधी मतांविषयीं तटस्थपणें व खोलपणें विचार करण्याची वृत्ति साधारण माणसांतच नव्हे तर मोठमोठ्या पुढाऱ्यांतहि दिसून येत नाहीं! परंतु गांधींच्या ठिकाणीं ही वृत्ति असूनहि जोंपर्यंत दुसऱ्याचें मन आपल्या विवेकबुद्धीला पूर्णपणें पटलें नाहीं तोंपर्यंत स्वतःच्या मताला दृढ चिकटून राहून त्याप्रमाणें वागत राहाण्याची चिकाटीहि त्यांच्यामध्यें होती. शक्य तोंवर कोणालाहि न दुखवतां, त्याच्याशीं असलेला संबंध न तोडतां, इतरांशीं मिळतें घेण्याच्या त्यांच्या सद्गुणामुळेंच ते महान् 'लोकसंग्रही' बनले. त्या बाबतींतील त्यांच्या सर्व गोष्टी सोडून त्यांच्या वात्सल्यपूर्ण व कर्तव्यनिष्ठ स्वभावाची एकच गोष्ट देऊन हा लेख मी पुरा करीत आहें. त्यावरून दिसून येईल कीं, ते खरोखरच विश्वकुटुंबी होते.

## महात्मेपणाची कसोटी

आजारी मनुष्याची शुश्रूषा करणें ही त्यांच्या आध्यात्मिक साधनेपैकीं एक साधना होती, अशी माझी समजूत आहे. ते साबरमती आश्रमांत असतां कामाचा व चिंतेचा कितीहि भार त्यांच्यावर असला तरी ते आश्रमांत असलेल्या प्रत्येक आजारी व्यक्तीला दिवसांतून एक वेळ तरी स्वतः भेटून त्याची विचारपूस केल्याशिवाय राहत नसत. हा त्यांचा नित्यक्रमच होता. परंतु या सर्वांत आश्चर्य वाटण्यासारखी गोष्ट म्हणजे १९३० च्या मार्चच्या १२ तारखेची. त्या प्रसंगीं देशांतील, त्यांतूनहि साबरमती आश्रमांतील वातावरण किती क्षुब्ध झालेलें होतें, तें त्या प्रसंगाचे अनुभवी जाणत असतील. ता. ११ ची रात्र क्षुब्धतेंत व केव्हां काय होईल या चिंतेंत सर्वांची गेली. त्या रात्रीं त्यांनीं प्रत्येकाला बोलावून ज्याच्या त्याच्या संबंधानुरूप प्रत्येकाला सांगितलें. मलाहि बोलावून आश्रमाच्या बाबतींत शेवटचें सांगावयाचें तें सांगितलें. अत्यंत गडबडींत सर्वांची ती रात्र गेली. पण ते स्वतः मात्र शान्त होते, स्थिर होते. अशाहि स्थितींत

## म. गांधी : कांहीं आठवणी

त्यांचें मन अविचल होतें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं सहा वाजतां दांडीकूच होणार होतें. निघणारी तुकडी सकाळीं तयार झाली. सर्वजण दोन रांगांत हारबंद उभे राहिले. अफाट जनसमुदाय त्या वेळीं लोटला होता. बापूजींच्या भाग्यानें, ऐश्वर्यानें, सामर्थ्यानें त्या दिवशीं जसें कांहीं शिखर गांठलें होतें! त्यांच्या-विषयीं अलोट भक्ति लोकसमुदायांत, सर्व देशांत तेव्हां उचंबळून आली होती.' ४२ च्या स्थितीपेक्षांहि ती स्थिति या दृष्टीनें श्रेष्ठ होती कीं, त्या वेळीं आमच्यांत भेद नव्हते, पक्ष नव्हते. भारताचे एकमात्र पुढारी ते त्या वेळीं मानले जात होते. अशा वेळीं बापूजी जर खरोखरच ' महात्मा ' नसते तर ते या स्थितीनें स्वतःच्या आत्मोन्नतीचा हेतु विसरून, अहंकारानें भरून गेले असते! परंतु बापूजींना अहंकाराचा स्पर्शहि झाला नाहीं. त्या वेळींहि त्यांना आपल्या जीवनहेतूचें विस्मरण झालें नाहीं. त्यांच्या रोजच्या कर्तव्याला ते विसरले नाहींत. त्या भयंकर गडबडींत, कूचाला निघण्याच्या ऐन गर्दीच्या प्रसंगीं, आश्रमांत असलेल्या एका गरीब कुटुंबांतील आजारी मुलीला भेटावयाला ते गेले. त्यांच्या राहण्याच्या जागेच्या मागच्या बाजूनें ते केव्हां बाहेर पडून गेले, तेंहि कोणास माहीत झालें नसेल. ती गरीब मुलगी, तिचें आजारपण वगैरेची किंमत त्या वेळच्या राष्ट्रीय लढ्याच्या दृष्टीनें कोणास काय वाटणार? परंतु विश्वकुटुंबी, अगाध वात्सल्यानें ज्याचें हृदय सदैव भरलेलें असे कर्तव्यनिष्ठ बापूजी तशा प्रसंगींहि त्या मुलीला विसरले नाहींत. अनेक उपाधी, अनेक कारभार यांची व्यवस्था लावण्याची गडबड व चालू संग्रामाची चिंता या सर्वांतून लक्ष व वेळ काढून ते त्या मुलीला भेटले. तो प्रसंग आजहि मला माझ्या समोर दिसत आहे! असे अनेक प्रसंग त्यांच्या जीवनांतील मीं पाहिले आहेत व त्यावरून मला वाटत आलें आहे कीं, बापूजींची योग्यता पूर्णपणें ओळखणें फार कठिण आहे!

असा एक महापुरुष जीवनाचा उच्च आदर्श साध्य करतां करतां आमच्या डोळ्यांसमोर निघून गेला. त्यानें आम्हांला केवळ धर्म सांगितला नसून तो आचरूनहि दाखवला. आम्हीहि त्यांच्या हयातींत त्यांच्यासारखें वागण्याचा प्रयत्न करीत आहों, असें दाखविलें. परंतु आजची देशस्थिति पाहतां, जनतेचें आचरण पाहतां, आमची मनःस्थिति तपासून पाहतां, प्रश्न उत्पन्न होतो कीं, त्यांच्या हयातींत त्यांच्यासारखें थोडेंबहुत वागल्यासारखें दाखवून आम्ही त्यांना फसवीत होतों कीं, आम्ही स्वतःलाच फसवीत होतों! यांपैकीं कोणती तरी गोष्ट सत्य असली पाहिजे. नाहीं तर इतक्या अल्पकाळांतच आमची मतिभ्रष्टता इतक्या थरास जाऊन कशी पोहोंचावी हा महान् दुःखजनक प्रश्न आहे! कित्येकांच्या मनांत आज तो घोळत आहे.

---

## जागतिक चिरशांतीचा मार्ग

जगांत जें जें कांहीं दुष्ट असेल त्यापासून सदैव संपूर्ण अलिप्त राहणें हाच गांधींच्या अहिंसा-वादाचा गाभा आहे. शस्त्रास्त्रांच्या कधींच न संपणाऱ्या परस्परईर्ष्येचा शेवट अखेर युद्धांतच होणार यांत शंकाच नाहीं. आजच्या शस्त्रास्त्र-चढाओढीनें प्रत्यक्ष युद्ध टाळण्याच्या भयंकर व क्रूर पद्धतींतच जागतिक युद्धाचें बीज उद्भवेल असें मला वाटतें. म्हणूनच आजकालच्या जगांतील अग्रेसर ठरलेल्या सर्व राष्ट्रांच्या राजकीय पुढाऱ्यांत गांधींचा मार्ग हाच जागतिक चिरशांतीच्या आशेचा एकमेव किरण होय. त्यांचे विचार इतर सर्व जागतिक पुढाऱ्यांपेक्षां भव्योदात्त होते हें कबूल करावेंच लागेल. म्हणूनच त्यांच्या विशिष्ट अहिंसातत्त्वाची कांस सर्व राष्ट्रांनीं धरल्याखेरीज आज गत्यंतर नाहीं.

—डॉ. आल्बर्ट आइन्स्टाइन

( संयुक्त-राष्ट्र-रेडिओवरील एका मुलाखतींतील भाषणांतून, २२-६-५० )







प्रा. निर्मलकुमार वसु[1]. अनु० श्री. वा. ना. जठार

# गांधीजींचें विविध दर्शन

## शुद्ध गीतापठनासंबंधीं कटाक्ष

रामधुन झाल्यानंतर गीतापाठ म्हणण्याची पद्धत होती. एका आठवड्यांत गीतेचे अठराहि अध्याय वाचले जात असत. आठवड्यांतील ज्या दिवशीं जे अध्याय वाचले जात असत त्यांची यादी खालीं देत आहे. शुक्रवारीं १ ला व २ रा अध्याय; शनिवारीं ३,४ व ५; रविवारीं ६,७,८; सोमवारीं ९,१०,११,१२; मंगळवारीं १३,१४,१५; बुधवारीं १६,१७, व गुरुवारीं १८ वा. गीतापाठाच्या वेळीं गांधीजी अंथरुणावर पडल्यापडल्याच काळजीपूर्वक ऐकत असत. पाठामध्यें कोठें चूक झाल्यास ते दुरुस्त करीत असत. निष्काळजीपणामुळें एखादा शब्द सुटल्यास ते तो पूर्ण करीत असत. शुद्ध उच्चाराकडे त्यांचें विशेष लक्ष असे ही गोष्ट एके दिवशीं विशेषेंकरून स्पष्ट दिसून आली. तो दिवस १९४६ चा २२ नोव्हेंबर होता. गांधीजी आगाखान पॅलेसमध्यें कैदेंत असतांना तेथेंच २२ फेब्रुवारी १९४४ रोजीं कस्तुरबांचा देहान्त झाला. तेव्हांपासून इंग्रजी महिन्याच्या २२ तारखेस सकाळच्या वेळीं प्रार्थनेमध्यें गीतेचे १८ हि अध्याय वाचले जात असत. मीं असें ऐकलें कीं, डॉ. सुशीला नायर ह्यांनीं ही पद्धत सुरूं केली. ज्या दिवसाची गोष्ट सांगत आहे त्या दिवशीं गांधीजी नेहमींपेक्षां कदाचित् एक तास आधीं जागे झाले होते; कारण सबंध गीता म्हणावयाला जास्त वेळ लागत असे. इतर दिवसांप्रमाणें प्रार्थना चालूं

---

१. श्री. निर्मलकुमार वसु हे कलकत्ता विश्वविद्यालयांत प्रागितिहासकाल ( Prehistory ) व मानवेतिहासशास्त्र ( Anthropology ) या विषयांचे प्राध्यापक, शिल्पकलेचे–विशेषतः ओरिसांतील शिल्पाचे–तज्ज्ञ आहेत. ते गांधीजींच्या तत्त्वप्रणालीचे अत्यंत आस्थेवाईक आणि चिकित्सक अभ्यासक असून त्यांनीं गांधीजींच्या लिखाणांतील निवडक भाग प्रसिद्धहि केले आहेत. आपल्या संस्मरणीय नोआखालीमहायात्रेला निघतांना म. गांधी यांनीं श्री. निर्मलकुमार यांना मुद्दाम बोलावून आपल्याबरोबर राहण्यास सांगितलें. गांधीजींच्या जीवनांतील या अखेरी-अखेरीच्या धीरोदात्त व करुणरम्य नोआखाली–कालखंडांत श्री. निर्मलकुमार वसु हे गांधीजींचे खाजगी चिटणीस म्हणून काम करीत असतांना त्यांना गांधीजींचें जीवन अत्यंत जवळून पहावयाला मिळालें. आपण केलेलें निरीक्षण श्री. निर्मलकुमार यांनीं 'शनिवारेर चिठी' या प्रसिद्ध बंगाली मासिकांत क्रमशः लेख लिहून प्रसिद्ध केलें. त्या बंगाली लेखाचें संगृहीत पुस्तक गेल्या वर्षी 'गांधीचरित' ( गांधीजींचें व्यक्तित्व ) म्हणून प्रसिद्ध झालें आहे. या पुस्तकाचा मराठी अनुवाद अमळनेर येथील प्रताप हायस्कूलमधील शिक्षक श्री. वा. ना. जठार यांनीं केला असून तो प्रकाशनाच्या वाटेवर आहे. त्यांतील कांहीं भाग निवडून वर लेखरूपानें दिला आहे. एका शास्त्रज्ञाच्या सहानुभूतिपूर्ण पण चिकित्सक दृष्टींतून होणारें हें गांधीजींच्या व्यक्तित्वाचें दर्शन वाचकांस उद्बोधक वाटेल असा विश्वास वाटतो.–आपल्या आगामी प्रकाशनांतील हा भाग 'नवभारता'ला दिल्याबद्दल आम्ही श्री. जठार यांचे आभारी आहोंत.

—का. सं.








होती. परंतु गीतापाठाचें काम एकावर न सोंपवितां आम्हीं आपसांत वाटून घेतलें. श्रीरामपूर गांवांतील एक गृहस्थ प्रार्थनेस आले होते, त्यांनीं ११ वा अध्याय वाचावयाचा होता. साधारण बंगाली लोक संस्कृत उच्चार जसे करतात तसे ते करीत होते. परंतु फार भराभर वाचीत असल्यामुळें मला सुद्धां ते नीट ऐकूं येत नव्हते. त्यांचा पाठ संपल्यावर इतरांनीं बाकीचे अध्याय म्हटले.

प्रार्थना संपल्याबरोबर गांधींजी उठून बसत असत; तेव्हां आम्ही त्यांची मच्छरदाणी काढून, खाटेवर चौरंग ठेवून त्याच्यावर कंदील व लेखन-साहित्य ठेवीत असूं. परंतु त्या दिवशीं मच्छरदाणी काढल्याबरोबर त्यांनीं विचारलें : "आज कोणी कोणी गीता म्हटली ?" सर्वांचीं नांवें ऐकून ११ वा अध्याय म्हणणाऱ्या गृहस्थांस त्यांनीं दोन गोष्टी सांगितल्या. बोलण्याच्या सुरांत संताप दिसून आला नाहीं. परंतु त्यांनीं जे शब्द वापरले त्यांत त्यांची तीव्र भावना दिसून आली. ते इंग्रजींत म्हणाले : "अशा तऱ्हेच्या गीतेच्या अशुद्ध पठनानें मृतात्म्याचा अपमान मी होऊं देणार नाहीं. येथें जें घडत आहे तें मृतात्म्याला कळतें कीं नाहीं तें मला माहीत नाहीं. परंतु माझा विश्वास आहे कीं गीतापठनानें मृतात्म्याचें थोडें फार कल्याण होत असावें. निदान आपलें तर कल्याण होतेंच. संस्कृत भाषा कठिण आहे. म्हणून त्याचा बरोबर उच्चार करण्याकरितां मी स्वतः भरपूर श्रम घेतले आहेत. काशी व श्रीरंगम् येथील पंडित संस्कृत उच्चार बरोबर करतात. त्यांच्याइतके शुद्ध उच्चार मी करूं शकतों अशी मी ऐट मारूं शकत नाहीं. परंतु अर्थ व उच्चार नीट शिकल्याखेरीज मी तुम्हांला पुन्हा अशा प्रसंगीं गीतापाठ करूं देणार नाहीं. आज ज्या प्रकारचा पाठ झाला त्यापेक्षां मौन राहणें योग्य झालें असतें !—कधीं कोणतेंही काम निष्काळजीपणानें करूं नये; त्यानें दुसऱ्यांची फसवणूक न होतां स्वतःचीच फसवणूक होते !"

येथें नमूद करणें जरूर वाटतें कीं, वरील हकीगत मी माझ्या रोजनिशींतून उद्धृत केली आहे. फक्त त्यांतील पहिलें वाक्य रोजनिशींत लिहिलेलें नव्हतें. तें माझ्या स्मृतींतून दिलें आहे. गांधीजींच्या मुखांतून इतकी कडक निर्भर्त्सना साधारणतः बाहेर पडत नाहीं म्हणूनच मी कदाचित् ती रोजनिशींत लिहिली नव्हती. परंतु मला वाटतें गांधींजींना दुरुस्त करण्याचा हक्क आम्हां कोणालाहि नाहीं. म्हणून माझ्या आठवणींत जसें तें वाक्य होतें तसच तें लिहिलें आहे.

ज्या दिवशीं ही गोष्ट घडली त्याच्या दुसऱ्या दिवशीं म्हणजे २३ नोव्हेंबर १९४६ रोजीं शनिवार होता म्हणून गांधीजींनीं ३ ते ५ अध्याय स्वतःच वाचले. आम्हीं त्यांच्या म्हणण्याप्रमाणें त्यांच्यासमोर बसून गीता उघडून त्यांचा पाठ ऐकत होतों. गांधीजींचे उच्चार शुद्ध होते. ते भराभर वाचीत नसत व वाचतांना अर्थ नीट समजून वाचीत असत. नुसत्या मंत्रपाठाप्रमाणें ते आवृत्ति करीत नसत, हें सहज समजून येत असे. गांधीजींचा पाठ मी ह्याच-वेळीं एकदां ऐकला होता. इतर वेळीं सुशीला नायर, सुशीला पै वगैरे लोकांचे पाठ मीं ऐकले आहेत. मनू १९ डिसेंबर १९४६ रोजीं श्रीरामपूर गांवांत आल्यानंतर दररोज नियमितपणें गीतापाठ करीत असे. ह्या सर्वांचेच उच्चार शुद्ध व निर्दोष होते. परंतु ते इतके भराभर वाचीत असत कीं श्रोत्यांच्या ध्यानांत त्याचा अर्थ येण्यापूर्वींच पाठाची गाडी पुढें जात असे व श्रोते पाठीमागें पडत असत.

## वैद्यकीय मदत करण्याची अनिवार्य हौस

श्रीरामपुरांत ज्या रस्त्यानें गांधीजी फिरावयास जात त्याच्या बाजूला एका मुसलमान शेतकऱ्याची झोंपडी होती. त्याचें नांव इस्माइल खोन्दकार चौधरी असें होतें. गांधीजी फिरावयास जातांना कधीं कधीं एखाद्या झोपडींत जाऊन घरांतील लोकांशीं गप्पागोष्टी करीत. १९४६ च्या २ डिसेंबरला सोमवारीं त्याचप्रकारें ते इस्माइल खोंदकाराच्या घरीं गेले असतां त्यांनीं ऐकलें कीं, घरांतील एक लहान मुलगा तापानें आजारी आहे व इस्माइलखांची प्रकृतीसुद्धा बरी नाहीं. कित्येक दिवसांपासून त्यांचें पोट साफ नव्हतें.

वैद्यकीय मदत करावयाची संधि मिळाल्यास गांधीजींना फार आनंद होत असे.







आजाऱ्यांच्या सेवेंत खरोखरच त्यांचा हातखंडा होता. सोमवार असल्यामुळें त्या दिवशीं त्यांचें मौन होतें. म्हणून एका कागदाच्या तुकड्यावर त्यांनीं लिहून दाखविलें कीं, 'मला त्या घरांत जे आजारी आहेत त्यांना औषधपाणी करण्याची इच्छा आहे.' फिरणें झाल्यानंतर गांधीजींच्या सांगण्यावरून आम्ही इस्माइलभियाच्या घरीं जाऊन त्याला मॅग्सल्फ दिलें व लहान मुलाला एनिमा देण्याकरितां आमच्या राहण्याच्या ठिकाणीं पाठवून देण्यास सांगितलें. परंतु इस्माइल त्याला तयार झाला नाहीं. त्याची अशी इच्छा होती कीं, आम्ही त्याच्या घरींच एनिमा द्यावा. कारण, कोण जाणें, कांहीं बरें वाईट झालें तर ! हें ऐकल्यावर गांधीजींनीं दुपारीं २ वाजतां ऊन पाणी करून ठेवण्यास सांगितलें व म्हणाले कीं 'मी स्वतःच जाऊन त्याला एनिमा देतों.'!

परंतु ह्या गोष्टीला आमचा तीव्र विरोध होता. श्री. परशुराम किंवा आमच्यावर कामाचा बोजा कितीहि असला तरी भर उन्हांत ह्या कामाकरितां अर्धा मैल दूर गांधीजींना पाठविल्यास लोक आम्हांला काय म्हणतील ! हें ऐकून गांधीजींनीं एका कागदाच्या तुकड्यावर कांहीं लिहिलें. वाचकांची उत्सुकता पुरी करण्याकरितां चिठ्ठींतील मजकूर खालीं देतों :

"मला जें सांगावयाचें आहे तें तुम्हांला नीट समजलें का ? ( १ ) एका आजाऱ्यास मॅग्सल्फ व दुसऱ्याला एनिमा. तो जेव्हां येथें येईल तेव्हां मी त्याला एनिमा देईन. ( २ ) सकाळीं म्हणजे आतां पोट रिकामें असतां एनिमा देऊं इच्छितों. केवळ स्वच्छ ऊन पाण्याची व्यवस्था ठेवा. ( ३ ) मूल केव्हां तयार असेल ? जर ह्या गृहस्थांची तशी इच्छा असेल तर उद्यां सकाळींच एनिमा देऊं. ( ४ ) ह्या म्हाताऱ्याच्या खरजेकरितां मलम पाहिजे. मलम येईल. ( ५ ) हाताला सहन होईल इतकेंच गरम पाणी पाहिजे. दहा औंस स्वच्छ पाण्यात दोन चमचे मीठ मिसळावें. एनिमा हळूंहळूं द्यावा म्हणजे आंतड्यामध्यें पाणी थोडा वेळ राहील. एनिम्याचा परिणाम झाल्यावर व पोटांतील पाणी पूर्ण बाहेर आल्यावर तेवढाच थंड पाण्याचा एनिमा द्यावा. मीठ किंवा दुसरें कांहीं मिसळूं नये. दर वेळेस जो मळ बाहेर पडेल तो तपासून पहावा व त्यांत जंत वगैरे आहेत किंवा कसें तें पहावें.

"दुसरा एनिमा दिल्यानंतर पाणी लौकर बाहेर न पडल्यास तुम्ही घरीं निघून या. घरांतील लोकांस मळ कसा काय होता तें कळविण्यास सांगा. दुसरी सूचना मिळेपर्यंत दररोज रात्रीं स्वच्छ केलेला अर्धा ड्राम ओवा आजाऱ्यास खाण्यास द्यावा.

"एनिमाच्या नळीच्या तोंडाला व्हॅसेलिन लावावें म्हणजे नळी घालतांना त्रास होणार नाहीं. काम झाल्यावर नळी पाण्यामध्यें उकळून घ्यावी."

आम्ही श्रीरामपुरांत ज्या घरीं राहात असूं त्याच्याजवळ दुसऱ्या एका घरांत कित्येक वर्तमानपत्रांचे बातमीदार रहात असत. दोन खोल्यांत मिळून ५–६ बातमीदार राहात असत. त्यांना काम भरपूर असल्यामुळें त्यांचीं अंथरुणें, कागदपत्र व इतर वस्तू अस्ताव्यस्त पसरलेल्या असत. मद्रासच्या इंग्रजी "हिंदु" वर्तमानपत्राचे बातमीदार श्री. रंगस्वामी ह्यांना बंगालच्या दमट हवेंत आल्याबरोबर आजार लागला. डोकेंदुखीमुळें त्यांना रात्रभर झोंप नव्हती. गांधीजींना ही बातमी लागली. व सकाळीं फिरून परत येत असतां ह्या बातमीदारांच्या खोल्यांकडे ते वळले. त्यांच्या बरोबरच्या लोकांपैकीं कांहीं लोक धांवत पुढें गेले व खोलींत अस्ताव्यस्त परसलेलीं अंथरुण–पांघरुणें, मच्छरदाण्या, कागदपत्र वगैरे शक्य तितकीं व्यवस्थित लावून, जमिनीवर पडलेल्या सिगारेटचीं थोटकें झाडून काढून, खिडक्या-दरवाजे उघडून थोडीफार स्वच्छता केली.

आजाऱ्याचा ताप पाहिल्यावर त्याच्या डोक्यावरून हात फिरवून मातीचें पोटिस लावण्यास त्यांनीं सांगितलें. गांधीजी दुपारीं पोटाला मातीचें जाड पोटिस बांधून थोडा वेळ पडून राहात असत. त्यामुळें श्री. परशुराम यास पोटिसाची चांगली माहिती होती. परशुरामानें जाऊन रंगस्वामींच्या कपाळाला मातीचें पोटिस लावलें. शिवाय अन्य उपचारांचीही व्यवस्था झाली. पोटिसामुळें डोकेंदुखी बरीच कमी होऊन आजाऱ्याला चांगली झोंप लागली व ते हळूंहळूं बरे झाले.

# गांधीजींचें विविध दर्शन

हजारों कामांच्या गर्दींतदेखील आजाऱ्याची शुश्रूषा किंवा औषधपाणी करण्याची संधि मिळाल्यास गांधीजींना फार आनंद होत असे. विशेषतः निसर्गोपचार करण्यास मिळाल्यास विशेषच आनंद. नोआखालींत जे लोक गांधीजींना भेटावयास येत असत, त्यांना कितीहि महत्त्वाचा विषय असला तरी फार वेळ देणें शक्य नव्हतें. तरीहि ता. ४।२।४७ रोजीं विनयभूषण दास नांवाच्या एका आजारी गृहस्थांनीं त्यांच्याकडे येऊन अर्ध्या तासाच्यावर निसर्गोपचाराच्या बाबतींत सल्लामसलत केली.

## देहदंडाची आसक्ति त्याज्य

स्नानाच्या नंतरच जेवणाचा कार्यक्रम असे. गांधीजींच्या भोजनासंबंधीं अशी एक वदंता आहे कीं, गांधीजी रोज दीड आणा किंमतीच्या अन्नापेक्षां जास्त अन्न खात नसत. ही दंतकथा कशी व केव्हां उत्पन्न झाली हें मला माहीत नाहीं. परंतु ह्याकरितां गांधीजींची कित्येक लोक विनाकारण कानउघाडणी करतांना मी पाहिलें आहे. भोजनासंबंधीं त्यांचा स्वतःचा नियम मात्र असा होता कीं, शरीर निरोगी व कार्यक्षम राखण्याकरितां जेवढ्या अन्नाची जरूर आहे तेवढें घेतलेंच पाहिजे. निरनिराळ्या व्यक्तींच्या आहाराचें प्रमाण व त्याकरितां खर्च निरनिराळा असणें साहजिकच आहे. मनुष्याच्या आवश्यक गरजांना ते जसें महत्त्व देत असत तसेंच दुसऱ्या एका गोष्टीकडेहि त्यांचें लक्ष होतें. केवळ जिव्हालौल्याकरितां किंवा इतर कांहीं कारणांकरितां गरजांची काटेकोर मर्यादा ओलांडणें हें सत्यापासून च्युत होणें होय. म्हणून आवश्यक गरजांची मर्यादा ओलांडणें केव्हांहि योग्य नाहीं. देशसेवकांनीं 'अस्वाद' हें व्रत अवश्य पाळिलें पाहिजे असें त्यांचें मत होतें. ब्रह्मचर्य पाळण्याकरितां ह्या व्रताची जरूर आहे असेंहि त्यांचें मत होतें. ते सर्व बाबतींत सत्याचा निकष लावीत असत. त्यामुळें अकारण देहदंडाच्या वा हठयोगाच्या ते विरुद्ध होते. शरीर निरोगी व कार्यक्षम करण्याकरितांच देहदंडाचा उपयोग केला जातो असें नाहीं; तर कित्येक वेळां त्याबद्दल वाटणाऱ्या आसक्तीचा उगम अहंकारांत असतो. म्हणूनहि देहदंडाची आसक्ति खोटी व त्याज्य आहे.

कै. महादेव देसाई यांनीं एकदां लिहिलें होतें कीं, खेडेगांवांतील कार्यकर्त्यांनीं खेडेगांवांतील सर्वसाधारण लोकांसारखेंच अन्न घेतलें पाहिजे अशी गांधीजींची इच्छा आहे. कदाचित् त्यांच्या जेवणाची किंमत रोजीं तीन आणे होत असेल. परंतु विनाकारण कमी भोजन करणें त्यांना मंजूर नव्हतें. एक कार्यकर्ता दररोज एकदांच जेवीत असे. रोज तीन छटाक तांदूळ, थोडी भाजी व डाळ आणि ताक एवढ्यावरच त्यानें भागवण्याची संवय केली होती. त्याकरितां त्याला रोजीं एक आणा खर्च येत असे. गांधीजींनीं ह्या कार्यकर्त्याला पुढील पत्र पाठविलें : "तुम्ही जेवणाचें प्रमाण फार कमी करून टाकलें आहे. तुम्ही जवळ जवळ उपाशीच राहातां. माझ्या कल्पनेप्रमाणें देवानें जी तुम्हांला साधनें दिलीं आहेत त्यांचा तुम्ही भरपूर उपयोग करीत नाहीं. एका गृहस्थाला खाजगी वापरण्याकरितां थोडे पैसे दिले गेले होते. परंतु त्या इसमाला त्या पैशांचा उपयोग कसा करावा हें माहीत नव्हतें किंवा माहीत असूनहि त्यानें त्याचा योग्य उपयोग केला नाहीं, तेव्हां त्याचेजवळील पैसे परत घेण्यांत आले, ही गोष्ट तुम्ही कधीं ऐकली नाहीं का ? जेव्हां शरीर आत्म्याविरुद्ध बंड करतें तेव्हांच त्याचें दमन करण्यांत किंवा त्याला कष्ट देण्यांत कांहीं अर्थ आहे. परंतु शरीर जेव्हां तुमच्या म्हणण्याप्रमाणें वागत आहे, व सेवाकार्यांत त्याला कांहीं अडथळे येत नाहींत तेव्हां त्याला उगीचच्या उगीच कष्ट देणें हें पाप आहे. सारांश विनाकारण देहदंड देण्यांत कांहींच पुण्य नाहीं."

## अ प रि ग्र ह

१९४७ च्या ऑगस्ट महिन्यांत जेव्हां ते शेवटच्या खेपेस पाटण्याहून कलकत्त्यास आले तेव्हां त्यांच्या सामानामध्यें खूप तपासून पाहिलें तरी दांतांची कवळी सांपडली नाहीं. पाटण्यास निरोप पाठवून विचारलें. तेथून श्रीमती मृदुला साराभाईनीं कळविलें कीं तेथेंहि ती सांपडली नाहीं. आम्ही नवीन दांत करविण्याबद्दल सुचविलें. परंतु गांधीजी कांहीं केल्या तयार होईनात. त्यांचें असें म्हणणें होतें कीं, 'ती सामानांत कोठें तरी पडली आहे; नीट तपासून पहा.' परंतु सामानांतील प्रत्येक वस्तू वेगवेगळी








काढून सामान तपासलें तरीहि जेव्हां ती कवळी सांपडली नाहीं तेव्हां एका डॉक्टर मित्रांना बोलावण्याबद्दल मीं सुचविलें. तेव्हां गांधीजी म्हणाले : " दांतांची किंमत इतकी आहे कीं, ते नवीन करण्याची मला जरूर नाहीं." पुष्कळ वादविवादानंतर असें ठरलें कीं, प्रत्यक्ष दातांच्या किंमतीपेक्षां डॉक्टरांची मजुरी जास्त असेल तरच डॉक्टरना बोलवावें नाहीं तर त्यांना विनाकारण भूर्दंड पडूं नये. जेव्हां त्यांना मीं म्हटलें कीं, हे डॉक्टर आमचे लहानपणचे दोस्त आहेत, तेव्हा त्यांनीं हंसून लिहून दाखविलें : " म्हणून त्याला शिक्षा देणें बरें नव्हे "!

सरतेशेवटीं गांधीजी तयार झाले. व रात्रभर जागून दांत तयार केले गेले. कारण दुसऱ्या दिवशीं पहांटेच आम्हांला नोआखालीस जावयाचें होतें. परंतु विधिलिखित निराळें असल्यामुळें पुढें नोआखालीस जाणेंच झालें नाहीं.

पुष्कळ वर्षांपूर्वीं रिचर्ड ग्रेग नांवाच्या एका अमेरिकन गृहस्थांनीं गांधीजींना म्हटलें होतें : " मी खर्च कमी करण्याचा फार प्रयत्न करतों. परंतु कांहीं केलें तरी पुस्तकें वाचणें व त्यांचा सांठा करणें ह्या मोहांतून मी कांहीं मुक्त होऊं शकत नाहीं. " गांधीजींनीं ह्याबाबत त्यांना पुढील सल्ला दिला : " जोंपर्यंत एखादी वस्तु वापरून तुम्हांस मानसिक आनंद व मदत होत असेल तोंपर्यंत ती ठेवणें योग्यच होईल. त्यागबुद्धीच्या भरांत किंवा कठोर कर्तव्यबुद्धीनें ती जर सोडून दिली तर, ती पुन्हां प्राप्त करून घेण्याकरितां मनाची सारखीच ओढ लागेल व ह्या अतृप्त वासनेमुळें मनाला शांति मिळणार नाहीं. जेव्हां मनाला दुसऱ्या एखाद्या वस्तूचें जास्त आकर्षण होईल, व पहिल्या वस्तूची गरज राहाणार नाहीं, किंवा ती नवीन ध्येयाच्या आड येत असेल, तरच ती पहिली वस्तू सोडावी."

### एका तरुण प्रेमिकाचें पत्र

नोआखाली जिल्ह्यांत श्रीरामपूर गांवांत असतांना त्यांना आलेल्या एका पत्राची मला विशेषेंकरून आठवण होते. कित्येक दिवसांपासून फार महत्त्वाची राजकीय चर्चा चालू होती. त्यामुळें आमच्या कॅंपमधील वातावरणसुद्धां भारावलेलें होतें. पुष्कळ प्रकारचीं पत्रें येत असत. एखाद्यांत अत्यंत प्रखर टीका असे; एखाद्यांत दंग्यांतील हृदयद्रावक गोष्टींचें वर्णन असे. ह्या परिस्थितींतच एके दिवशीं एका तरुणाचें एक लांबलचक पत्र गांधीजींना आलें. फूलस्कॅप कागदाचीं जवळ जवळ सहासात पानें वाचून मला समजलें कीं, तो तरुण एका तरुणीच्या प्रेमांत सांपडला होता. लग्न करण्याची तीव्र इच्छा. परंतु मार्गांत दोन मोठे अडथळे होते. एक, जात व दर्जा यांचा अडथळा व दुसरा, वडिलांचा विरोध. चुकीच्या इंग्रजींत हें काव्यमय लिहिलेलें पत्र वाचून माझें मन देखील बरेचसें हलकें झालें व तें गांधीजींना गंमतीनें वाचून दाखविण्याचें मी मनांतल्या मनांत ठरविलें.

स्नानानंतर गांधीजी जेव्हां जेवावयास बसले तेव्हां मी तें पत्र त्यांच्यापुढें ठेवलें, अर्थात् त्यांतील सर्वच मजकूर कांहीं मी वाचला नाहीं. फक्त निवडक उतारे वाचूं लागलें. एके ठिकाणीं त्या तरुणानें असें लिहिलें होतें कीं हें लग्न जर झालें नाहीं तर आपलें सर्वच आयुष्य फुकट जाईल. पत्रांतील सर्वच भाषा आतां माझ्या लक्षांत नाहीं. परंतु त्यानें एके ठिकाणीं असें लिहिलें होतें कीं, " If we are united ........" वगैरे. हें वाक्य ऐकत असतांना गांधीजी जेवतां जेवतांच म्हणाले : "उसके बाद क्या लिखा है ? Divided we fall?" मी मनांतल्या मनांत खूप हंसलें. परंतु बाहेर गांभीर्याचा आव आणून म्हणालें : " हां, तसेंच कांहीं."

पत्र वाचून झाल्यावर मी तें बाजूला ठेवून देत होतें; इतक्यांत गांधीजींनीं आपला डावा हात पुढें करून तें माझ्याकडून मागून घेतलें. मीं पाहिलें कीं त्यांनीं तें काळजीपूर्वक स्वतःच्या पत्रांमध्यें ठेवून दिलें. राजकुमारी अमृत कौर, पं. जवाहरलाल नेहरू वगैरे लोकांच्या पत्रांमध्येंच ह्या तरुणाच्या पत्राला स्थान मिळालें ! नंतर त्या दिवशीं गांधींजींनीं जीं स्वतः पत्रें लिहिलीं त्यांमध्यें त्या तरुणालाहि एक लहानसें पत्र होतें. त्यांत त्यांनीं लिहिलें होतें : " जात व दर्जा ह्या गोष्टींमुळें तुम्हीं आपल्या विचारापासून ढळूं नका. परंतु तुमचें प्रेम खरें आहे कीं नाहीं तें पारखून पाहा. आधीं स्वतःच्या पायावर उभें राहाण्याचा प्रयत्न करा. पैसे मिळवून जेव्हां








स्वावलंबी बनाल तेव्हांहि जर तुमचें प्रेम शुद्ध राहिलें तरच लग्न करा. ह्या प्रकारच्या तपश्चर्येनें स्वतःच्या प्रेमाची शुद्धता पारखून घ्या."

मी माझ्या समाधानाकरितां गांधीजींना विचारलें कीं, " तुम्ही ह्या प्रकारच्या पत्राला उत्तर कां दिलें ? " गांधीजी म्हणाले : " ह्या तरुणानें तें पत्र कितीदुःखित अंतःकरणानें व तीव्र भावनेनें लिहिलें ह्याचा तुम्ही विचार करा. माझा थोडा वेळ देऊन जर त्याला कांहीं मदत करतां आली तर तें योग्यच होईल." मी आश्चर्यचकित झालों व मला तेव्हां समजलें कीं, निरनिराळ्या देशांतील हजारों लोक आपल्या वैयक्तिक प्रश्नांकरितां देखील गांधीजींकडे कां धांव घेत असत ! ह्या लोकांच्या मनांत असा विश्वास होता कीं, येथेंच आपल्याला थोडा फार आसरा मिळेल, दुःखाची पूर्ण निवृत्ति झाली नाहीं तरी सहानुभूतीचा थोडा तरी ओलावा मिळेल !

**वा द प द्ध ति**

मला स्वतःला फार आश्चर्य वाटत असें कीं, वादविवाद करीत असतांना गांधीजी विरुद्ध मताचें खंडन करण्याचा कधींहि प्रयत्न करीत नसत. प्रतिपक्षाच्या बाजूमधील लंगड्या मुद्द्यांकडे बोट न दाखवितां ते आपल्या मताचें समर्थन करणारे मुद्दे एकामागून एक मांडीत असत. त्यामुळें अखेरपर्यंत मतभेद कायम राहिले तरी एकमेकांमध्यें कोणत्याहि तऱ्हेची कटुता निर्माण होत नसे.

स्वतःला नोआखालींत डांबून कां घेतलें आहे ह्या प्रश्नाच्या उत्तरादाखल प्रार्थनेच्या शेवटीं भाषण करतांना ता. २६-११-१९४६ रोजीं गांधीजी म्हणाले: " पुष्कळ बीं इकडेतिकडे पेरण्यापेक्षां एका बींतूनच चांगलें रोपटें येईल असा प्रयत्न करणें जरूरीचें आहे." ता. २७-२-४७ रोजीं हायमोचर नांवाच्या खेडेगांवांत बंगालचे माजी पंतप्रधान फजलूल हक्-साहेब गांधीजींना म्हणाले होते : " हिंदुस्थानच्या एका कोपऱ्यांत सामान्य हिंदुमुसलमान-जनतेचें हृदय-परिवर्तन करून आपण शान्ति स्थापन करूं इच्छितां. त्याचेऐवजीं आपण दिल्लीस जाऊन दोन्ही जमातीच्या पुढाऱ्यांमध्यें समझोता निर्माण करण्याचा प्रयत्न करा. नाहीं तर सबंध देशामध्यें रक्ताचे पूर वहातील. " उत्तरादाखल गांधीजी त्यांना म्हणाले होते : " माझें काम दिल्लींत नसून येथेंच सर्वसामान्य लोकांच्या अंतःकरणांत एकतेचें बीज पेरणें हें आहे. ह्या बीजांतून वृक्ष निर्माण झाल्यास त्याचा परिणाम सर्व हिंदुस्थानच्या जनतेवर होईल. सर्वसामान्य जनतेमध्यें हा इष्ट बदल झाल्यास त्यांच्या पुढाऱ्यांतहि तो बदल घडून येईल. दिल्लीचें काम माझें नव्हे. तथापि, दिल्लीच्या लोकांना माझ्या सल्ल्याची जरूर भासल्यास मी तेथें जाऊं शकतों. माझें खरें काम सर्वसाधारण लोकांच्यामध्येंच आहे ". गांधीजींचा हा युक्तिवाद ऐकूनहि हक्साहेब जेव्हां पुन्हां तोच आग्रह करूं लागले तेव्हां गांधीजी म्हणाले : " माझा स्वभाव निराळा आहे." वादविवादांत प्रतिपक्षाचा पराभव करण्याऐवजीं आपण अवलंबिलेल्या मार्गानें आपल्याला अधिक चांगल्या रीतीनें कसें जातां येईल त्याचाच ते प्रयत्न करीत असत.

गांधीजी ज्या प्रकारें चर्चा करीत असत तो प्रकार पाहून मला नारदीय भक्तिसूत्रांतील खालील सूत्राची आठवण होते : ' ओम् तस्मिन्ननन्यता तद्विरोधिषु उदासीनता । ' ( २-९ ), म्हणजे स्वतःच्या मार्गाला चिकटून राहाणें व दुसऱ्या मार्गाबद्दल उदासीन राहणें, ह्यानेंच साधना दृढ होते.

गांधीजींचें ह्या प्रकारचें आचरण मीं पुष्कळदां पाहिलें आहे.

---

## माझा धर्म

मी कसा राहतों, कसा जेवतों, कसा बसतों, कसा बोलतों, एकंदरींत कसा वागतों ह्याचें, म्हणजे माझ्या जीवनाचें तुम्हीं निरीक्षण केलें पाहिजे. ह्या सर्वांचा समुदाय म्हणजेच माझा धर्म होय.

—म. गांधी










आल्डस हक्स्ले

# जेफर्सन आणि गांधी

[1]गांधीजींचा देह शेवटीं दहनभूमीकडे एका शस्त्रवाहू रणगाडीवरून मिरवीत नेला ! या स्मशानयात्रेंत रणगाडे, चिलखती गाड्या, सैनिकदलें, हिंदी विमानदलांतील विमानें यांनींहि भाग घेतला होता. अहिंसा आणि आत्मबल यांचा प्रचार हें ज्याचें अवतारकार्य त्या महात्म्याच्या अंत्य सन्मानाप्रीत्यर्थ हिंसा आणि दडपशाही यांच्या प्रतीकांची—शस्त्रास्त्रसंभाराची मिरवणूक निघावी हा केवढा विलक्षण आणि शोचनीय असा उपरोध ! पण या उपरोधामागील विरोध अपरिहार्यच होता. राष्ट्र म्हणजे एक प्रभुत्वसंपन्न सामर्थ्यशाली समाज. त्याच्याजवळ दुसऱ्या तशाच प्रभुत्वसंपन्न सामर्थ्यशाली राष्ट्राशीं युद्ध करण्याकरितां शस्त्रास्त्रें लागत असतात. म्हणून साहजिकच एखाद्या राष्ट्रातर्फे जर एखाद्या विभूतीला मानवंदना द्यायची असेल—मग ती विभूति प्रत्यक्ष गांधीजी का असेना—तर त्या मानवंदनेचा आविष्कार लष्करी आणि दडपशाहीच्या शस्त्रास्त्रसंभाराच्या द्वारेंच होणार !

**व्याघ्र गेला, पण व्याघ्रवृत्ति कायम !**

सुमारें ४० वर्षांपूर्वीं गांधीजींनीं 'हिंद स्वराज्य'-मध्यें आपल्या देशबांधवांना असा सवाल टाकला होता : " स्वराज्य किंवा ' होमरूल ' म्हणजे काय ? हल्लींचीच समाजरचना, फक्त ती इंग्रजांच्या हातांतून काढून हिंदी राजकारणी पुढाऱ्यांच्या हातीं कायम ठेवणें हाच एक जर स्वराज्य मिळविण्यामागील हेतु असेल, तर त्याचा अर्थ एवढाच कीं, आपणाला वाघाच्या तावडींतून सुटायचें आहे, पण वाघाचा हिंस्र स्वभाव मात्र आहे तसाच कायम ठेवायचा आहे ! माझा स्वराज्याचा अर्थ निराळा आहे. व्यक्तिशः आपण प्रत्येकानें स्वतःवर ताबा मिळविणें, सत्याग्रहाच्या वृत्तीनें आणि पद्धतीनें सामुदायिक कृति करावयास शिकणें आणि

---

१. ' Ends and Means ', ' Point Counter Point ', 'Perennial Philosophy' इत्यादी ग्रंथांचे लेखक, सुप्रसिद्ध ब्रिटिश ग्रंथकार, आल्डस हक्स्ले यांनीं गांधीजींच्या निधनानंतर लिहिलेला 'A Note on Gandhi' या नांवाचा लेख 'Vedanta and the West ' ( Los Angeles ) यामध्यें प्रसिद्ध झाला. तोच लेख ( १ ) 'विश्वभारती'नें २-१०-१९४९ रोजीं प्रसिद्ध केलेल्या 'Gandhi Memorial Peace Number ' मध्यें आणि ( २ ) डॉ. राधाकृष्णन् यांनीं संपादिलेल्या 'Mahatma Gandhi' या सुप्रसिद्ध लेखसंग्रहाच्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या दुसऱ्या आवृत्तींत, पुनर्मुद्रित झाला आहे. त्याच लेखाचा ' नवभारत'करितां केलेला हा अनुवाद आहे. ऑल्डस हक्स्ले यांनीं या लेखांत आधुनिक यंत्रयुगीन सुधारणेंत नष्टप्राय होऊं पहाणारें मानव्य, त्यास पुनरुज्जीवित करण्याकरितां विकेन्द्रीकरणाची आवश्यकता, विकेन्द्रीकरणाबाबत गांधीजी आणि अमेरिकन लोकशाहीचे महान् प्रवक्ते व एकवेळचे अमेरिकेचे अध्यक्ष टॉमस जेफर्सन ( १७४३-१८२६ ) या दोघांमधील विचारसाम्य, गांधीजींनीं पुढें जाऊन त्या विचारांत टाकलेली महत्त्वाची भर—यांबाबत उद्बोधक विचार प्रकट केले आहेत.

—का. सं.



अनुक्रमणिका

भारतीय संस्कृतीमधील उच्च ध्येयें प्रत्यक्षांत आणणें असा माझा स्वराज्याचा अर्थ आहे."

ज्या वेळेला सर्व जगच युद्धाकरितां संघटित व सनद्ध होत आहे, त्या वेळेला भारताला तरी इतर राष्ट्रांप्रमाणेंच 'राष्ट्र' म्हणूनच संघटित होण्या-खेरीज कोणता अन्य मार्ग उरतो ? जुलमी परकीय राजवटीविरुद्ध चालविलेल्या अहिंसात्मक संग्रामाच्या अग्रभागीं जे स्त्री-पुरुष. होते, त्यांच्याच हातांत आज लष्करी व दडपशाहीच्या शस्त्रसाधनांनीं सुसज्ज असें राज्य अकस्मात् येऊन पडलें आहे ! जणूं एका रात्रींत कायापालट होऊन एक वेळचे कैदी आणि शांतिवादी हे तुरुंगाधिकारी आणि सेनापति बनले आहेत !

## राष्ट्रवादाचा इतिहास काय दाखवितो ?

हें जें घडलें त्यापेक्षां दुसरें-तिसरें कांहीं घडेल अशी आशा करावयाला इतिहासांत तरी दुसरें प्रमाण सांपडत नाहीं. स्पॅनिश वसाहतींना जेव्हां स्वातंत्र्य मिळून तीं स्वतंत्र राष्ट्रें बनलीं, तेव्हां तरी काय झालें ? त्यांच्या नवीन शास्त्यांनीं सैन्यें उभारलीं व ते एकमेकांशीं लढाई करूं लागले. युरोपमध्यें मॅझिनीनें ध्येयवादी व मानव्य प्रेरित राष्ट्रवादाचा प्रचार केला; परंतु जेव्हां जुलमानें गांजलेले लोक त्या जुलुमापासून मुक्त होऊन स्वतंत्र झाले त्या वेळेला तेच स्वतः आक्रमक आणि साम्राज्यवादी बनले ! याशिवाय दुसरें कांहीं घडून येणें शक्यहि नव्हतें. कारण ज्या एका विशिष्ट चाकोरींतून किंवा सांच्यांतून आपण विचार करतों त्यांतूनच आपले तात्त्विक व व्यावहारिक निर्णय बनत असतात. युक्लिडचीं गृहीतकृत्यें एकदां मान्य केल्यावर, त्रिकोणांतील तीन कोनांची बेरीज दोन काटकोनांइतकी असते हा सिद्धान्त अनिवार्यपणें मानावाच लागतो. तसेंच राष्ट्रवादाचीं गृहीतकृत्यें एकदां मान्य केलीं कीं त्या-मागून शस्त्रास्त्रें, युद्ध, आणि राजकीय व आर्थिक सत्तेचें केन्द्रीकरण हीं मान्य करणें प्राप्त होतेंच !

आपल्या विचारांचे व भावनाचे बनलेले सांचे लवकर बदलणें अशक्य असतें. आपली हल्लींची राष्ट्रवादी विचारसरणी बदलून तिच्याऐवजीं विश्वराज्य-विषयक विचारसरणी प्रस्थापित व्हावयाला बराच काळ—दोन पिढ्या किंबहुना दोन शतकेंही जावीं लागतील. तोंपर्यंत मध्यतरींच्या काळांत यंत्रविज्ञान ( Technology ) झपाट्यानें वाढत जाणार ! त्याची वाढ कोणींहि रोधूं शकत नाहीं.

गांधींजी राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या ऐन झगड्यांत सांपडले. पण त्यांना अशी आशा होती कीं, हिंसेचा प्रतिकार सत्याग्रहाच्या मार्गानें करून आणि सामाजिक व आर्थिक जीवनाला विकेन्द्रीकरणाचीं तत्त्वें लावून आपण हा झगडा, हा संघर्ष नष्ट करूं शकूं. परंतु अजूनपर्यंत त्यांची आशा प्रत्यक्षांत अवतरूं शकलेली नाहीं. आज तरी भारतीय राष्ट्र इतर राष्ट्रां-प्रमाणेंच लष्करी शस्त्रास्त्रांनीं सुसज्ज आहे. भारता-पुढें आज जी अर्थव्यवस्थेची योजना दिसून येते, ह्या योजनेचें उद्दिष्ट—मोठमोठे उद्योगधंदे व कारखाने भांडवलशाहीच्या किंवा सरकारच्या नियंत्रणाखालीं काढणें, सत्तेचें अधिकाधिक केन्द्रीकरण करणें, जीवनमान अधिकाधिक वाढविणें, आणि त्याच्याच अनुषंगानें उद्योगधंदे खूप वाढलेल्या इतर राष्ट्रांतून जें दिसून येतें तें म्हणजे तत्संबद्ध मनोविकृती, मानसिक-शारीरिक रोग निर्माण करणें—हें उद्दिष्ट सरळ दिसतें. परकीय सत्तेचा व्याघ्र हुसकावून लावण्यांत गांधीजींना यश मिळालें खरें. पण राष्ट्रवादामागील जी मूळ हिंस्र व्याघ्रवृत्ति ती बदलण्याचें मात्र त्यांचे प्रयत्न अपयशी ठरले.

## गांधीजींनीं ओळखलेलें सत्य

तरी पण आपण निराश होण्याचें कारण नाहीं. कारण आज वस्तुस्थितीचें दडपणच इतकें बलवत्तर आणि उत्तरोत्तर दुःसह होत जाणार आहे कीं, गांधीजींची विचारसरणी आपणाला अनिवार्यपणें स्वीकारावी लागेलच लागेल ! आज ना उद्यां लोकांना कळून येईल कीं, या स्वप्नदर्शी स्वप्नाळु माणसाचे पाय शेवटीं पृथ्वीवरच पक्के रोंवलेले होते आणि हा आदर्शवादी अत्यंत श्रेष्ठ व्यवहारवादी होता. गांधीजींच्या सामाजिक आणि आर्थिक विचारसरणीच्या बुडाशीं मानवी स्वभावा-बद्दलचा, या विश्वांतील मानवाच्या स्थानाबद्दलचा वास्तववादी व वस्तुनिष्ठ दृष्टिकोण होता. त्यांनी एका बाजूनें हें ओळखलें होतें कीं, माणसानें आपल्या वाढत्या संघटनेच्या आणि यंत्रविज्ञानाच्या जोरावर सृष्टीवर कितीहि अचाट विजय मिळविलेले असले,

तरी त्यामुळें मूळ वस्तुस्थिति कांहीं बदललेली नाहीं व ती बदलणारहि नाहीं. ती वस्तुस्थिति अशी कीं, माणूस हा शेवटीं लहानसाच प्राणी आहे, आणि बहुतेक बाबतींत त्याचें सामर्थ्यहि मर्यादितच आहे. दुसऱ्या बाजूनें गांधींनीं ईंहि ओळखून ठेवलें होतें कीं, माणसाचें शारीरिक व बौद्धिक सामर्थ्य कितीहि मर्यादित असलें तरी, त्याचें आध्यात्मिक सामर्थ्य मात्र अमर्याद आहे; एवढेंच नव्हे तर, या दोन गोष्टी परस्परांशीं सुसंगतहि आहेत ! गांधीजींच्या बहुतेक सर्व समकालीनांची एक चूक होत होती. या विचारवंतांना वाटे कीं, आधुनिक संघटनाचातुर्याच्या जोरावर आणि यंत्रविज्ञानाच्या किमयेनें या क्षुद्र मानवाला आपण 'अतिमानव' बनवूं शकूं व मानवाला आध्यात्मिक साक्षात्काराच्या अनंत शक्ती आहेत असें जें निरर्थक म्हटलें जातें, तें आपण निराळ्या मार्गांनीं त्या शक्ती विकसित करून सार्थ करून दाखवूं शकूं !

## प्रेम वैयक्तिक संबंधांतूनच निर्माण होतें

स्थल-जलचर ( amphibious ) प्राण्याप्रमाणें द्विविध सृष्टींत विहार करणारा—शारीरिक आणि आध्यात्मिक सीमारेषेवर वावरणारा—असा जो हा मनुष्यप्राणी, त्याला अनुरूप अशी समाजव्यवस्था, अर्थव्यवस्था व राज्यव्यवस्था कोणती ? या प्रश्नाला गांधीजींचें उत्तर अत्यंत सार्थ आणि समंजसपणाचें होतें. त्यांचें म्हणणें असें कीं, " माणसांनीं आपल्या शारीरिक व मानसिक मगदुराला झेंपतील एवढ्याच प्रमाणाचे व आकाराचे समाज किंवा समूह बनवून त्यांच्या चौकटींत आपलें जीवन व्यतीत करावें; हे समाज एवढ्या लहान प्रमाणावर असावेत कीं, ज्यायोगें खरेंखुरें स्व-राज्य किंवा स्व-आयत्तता, स्वतःचा कारभार स्वतःच पहाणें आणि वैयक्तिक जबाबदाऱ्यांचें पालन करणें, हीं सुलभ व्हावींत; या लहान समाजांचे मोठे संघ बनायचे तर, ते अशा रीतीनें बनावेत कीं, ज्यायोगें सत्तेचा दुरुपयोग करण्याचा मोहच उत्पन्न होऊं नये ! " लोकसत्ताक राज्य जसजसें मोठमोठें होत जातें, तसतशी लोकांची सत्ता कमीकमी होत जाऊन, आपापल्या जबाबदाऱ्या पार पाडण्याच्या बाबतींत व्यक्तींचें व स्थानिक समूहांचें स्वातंत्र्य पार नष्ट होतें. प्रेम आणि स्नेह या भावनांचा गाभाच वैयक्तिक संबंधांमध्यें असतो. स्नेह किंवा बंधुभावना, किंवा सेंट पॉलनें ज्या अर्थानें 'चॅरिटी' शब्द योजला ती 'चॅरिटी' म्हणजे प्रेमभावना किंवा आत्मौपम्यभावना, ही लहान लहान समूहांतूनच व्यक्त होऊं शकते. अर्थात् याचा अर्थ असा नव्हे कीं, समूह लहान असला कीं आपोआपच हटकून त्यांत स्नेहभावना निर्माण होते. लहान समाजांत ती निर्माण होणें शक्य असतें एवढाच त्याचा अर्थ. मोठ्या, अवाढव्य समूहांत ती शक्यताहि उरत नाहीं. कारण अशा समूहांतील व्यक्तींमध्यें वैयक्तिक संबंध येणेंच दुरापास्त होऊन बसतें ! " He, that loveth not, knoweth not God; for God is love." म्हणून प्रेमभावना ही आध्यात्मिकतेचें जसें साधन तसें साध्यहि आहे. ज्या सामाजिक संघटनेच्या बहुतेक व्यवहारांतून ही प्रेमभावना प्रकट करणेंहि अशक्यप्राय होत जातें, ती संघटनाच वाईट म्हटली पाहिजे.

## विकेन्द्रीकरण व यंत्रविज्ञान यांचा समन्वय

आर्थिक विकेन्द्रीकरण आणि राजकीय विकेन्द्रीकरण हीं दोन्हींहि बरोबरच झालीं पाहिजेत. जमीन, उपजीविकेचीं साधनें, स्थानिक बाजारहाटाच्या सोयी हीं सर्व व्यक्ती, कुटुंबें आणि लहान लहान सहकारी संस्था यांच्या मालकीचीं असावींत. उत्पादनाचीं साधनें म्हणजे माणसानें हातानें वापरावयाचीं तेवढींच साधनें ( Hand Tools ) असा गांधीजी उत्पादनसाधनांचा अर्थ करीत असत. इतर विकेन्द्रीकरणवादी म्हणतात—आणि मला सुद्धां त्यांचें म्हणणें मान्य आहे—कीं, विजेच्या वा अन्य शक्तीनें चाललेल्या यंत्रांना उत्पादनसाधनें म्हणण्यास हरकत असूं नये. मात्र तीं शक्तिप्रेरित यंत्रें व्यक्तींना व लहान सहकारी संस्था यांना पेलण्याजोगीं, लहानच असावींत. पण हीं लहान लहान शक्तिप्रेरित यंत्रें तयार करावयाचीं तर त्याकरितां मोठे यंत्रशास्त्रविज्ञानयुक्त अवाढव्य कारखाने काढावे लागतील. हे कारखानेच जागतिक उत्पादनाचा तिसरा हिस्सा खाऊन टाकतील ! म्हणजे जगांत विपुलता निर्माण करण्याकरितां व्यक्ती आणि लहान समूह यांना पेलण्याजोगीं यांत्रिक साधनें; तीं यांत्रिक साधनें निर्माण करावयाला मोठमोठे केन्द्रीभूत कारखाने, ही आपत्ति अटळ आहे हें खरें. परंतु विकेन्द्री-








करण आणि यंत्रविज्ञान यांचा समन्वय करावयाचा तर एवढी किंमत म्हणजे कांहीं फार नव्हे! यंत्र-विज्ञानामध्यें सुखसोयींची रेलचेल करण्याचें सामर्थ्य आहे एवढ्याचकरितां केवळ यंत्रविज्ञानाच्या पाठी-मागें लागलें तर लष्करी यांत्रिकपणा उत्पन्न होऊन जीवनांतील स्फूर्ति व स्वातंत्र्यप्रेरणा नष्ट होऊन जातील! उलटपक्षीं, यंत्रविज्ञानाच्या सामर्थ्या-कडे संपूर्ण दुर्लक्ष केलें तर, समाजांत ठाण देऊन बसलेलें दारिद्य कधींहि नष्ट होणार नाहीं; उलट त्या दारिद्र्यामुळें अव्यवस्था माजून मानवी स्वातंत्र्याचा नाश होईल. म्हणूनच हे दोन्हीहि आत्यंतिक कोटीचे पक्ष सोडून आपल्याला असा समन्वय साधावयाचा आहे कीं, ज्यांत सामाजिक आणि मानसिक दृष्ट्या फारसा भूर्दंड द्यावा न लागतां आपणा-ला आधुनिक यंत्रविज्ञानाचा फायदा घेतां येईल.

## जेफर्सनचें राजकीय तत्त्वज्ञान

अमेरिकेंत टॉमस जेफरसन हा पाश्चात्य लोक-शाहीचा एक महान् द्रष्टा होऊन गेला. त्याचें मत असें होतें कीं, राज्यसत्तेचें जास्तींत जास्त विकेन्द्रीकरण करावें. त्याच्या प्रत्येक घोषणेचें पालुपद हें असें : " Divide the countries into Wards देशांचे लहान लहान मोहल्ल्यांइतके विभाग पाडा". जेफर्सनच्या घोषणेंमागील ध्येयाचें प्रो. जॉन डयूई यांनीं असें स्पष्टीकरण केलें आहे : " प्रत्येक वार्ड हें लहानसें प्रजासत्ताक राज्यच होय. या छोट्या प्रजा-सत्ताक राज्यानें एका 'वार्डन'च्या नेतृत्वाखालीं आपा-पल्या सर्व कारभाराच्या बाबतींत शासनसत्तेचे सर्व मुलकी व लष्करी अधिकार वापरावेत. हा सर्व कारभार वार्डनच्या प्रत्यक्ष नजरेखालीं असल्यामुळें तो मोठ्या राज्यांच्या कारभारापेक्षां अधिक चोख आणि कार्यक्षम ठरेल. शिवाय, जर एखाद्या देशव्यापी महत्त्वाच्या गोष्टीबाबत निर्णय घ्यावयाचा असेल, तर सर्वच 'वॉर्डां'ची सभा एका दिवशीं घेऊन त्यांचें सामुदायिक मत घेण्यांत यावें. जेफर्सनची ही योजना अंमलांत आली नाहीं ही गोष्ट वेगळी. परंतु ही योजना म्हणजे जेफर्सनच्या राजकीय तत्त्व-ज्ञानाचा गाभा होय." जेफर्सनची योजना जर अंमलांत आली असती, तर अमेरिका हें जें केवळ ४८ राज्यांचें संघराज्य आहे, त्याऐवजीं तें हजारों स्वायत्त अशा छोट्या छोट्या विभागां (Wards)-चें संघराज्य झालें असतें. जेफर्सनच्या राजकीय तत्त्व-ज्ञानाचें अधिष्ठान गांधीजींच्या सारखेंच मूलतः नैतिक व धार्मिक होतें. सगळे मानव हे समान आहेत. कारण एकाच परमेश्वराचीं तीं लेकरें आहेत. जसे या मानवांचे कांहीं हक्क आहेत तशाच जबाब-दाऱ्याहि आहेत. हे हक्क आणि जबाबदाऱ्या पार पाडावयाचा उत्तम उपाय म्हणजे लहान लहान स्वायत्त प्रजासत्ताक राज्यें बनविणें, त्यांचीं घटक राज्यें बनविणें आणि त्या घटक राज्यांचें संघराज्य बनविणें—अशा चढत्यावाढत्या श्रेणी निर्माण करणें हाच होऊं शकेल.

## माणुसकीच्या शक्तीवरील श्रद्धा

प्रो० डयूईनीं म्हटलें आहे : " जसे दिवस जातात तसे कालमानानुसार शब्दहि बदलतात आणि शब्दांमागील अर्थहि बदलत जातात. प्रजासत्ताक संस्थाच तेवढया कां चांगल्या, अमकी शासन-व्यवस्था बरी किंवा वाईट, हें ठरविण्याकरितां कांहीं नैतिक निकष लागतो. त्या नैतिक निकषावरील आपली श्रद्धा जेफर्सननें ज्या परिभाषेंत व्यक्त केली, ती परिभाषा आज प्रचलित नाहीं हें खरें. परंतु आज लोकशाहीवरील हल्ले परतवून लावून लोक-शाही जर शाबूत ठेवावयाची असेल, तर जेफर्सननें लोकशाहीचें जें नैतिक अधिष्ठान आणि उद्दिष्ट मानलें ती त्याची भूमिका घेतल्याशिवाय दुसरा तरणोपाय नाहीं. अर्थात् ती भूमिका घेतांना लोकशाहीच्या बुडाशीं असलेलीं तत्त्वें व्यक्त करण्याकरितां आप-णांला निराळी परिभाषा योजावी लागेल. सर्वाधि-कारशाही किंवा झोटिंगशाही हिला जर यशस्वी रीतीनें तोंड द्यावयाचें असेल, तर केवळ आर्थिक भर-भराटीचा उदोउदो करून किंवा कायद्यांच्या कलमांचा व राजकीय घटनांचा भक्तिभावानें जप करून तें साधणार नाहीं. त्याकरितां सामान्य माणुसकीवर, मानवी मनाच्या सुप्त शक्तींवर, विशेषतः विवेक (reason) आणि सत्य यांकडे मानवी मनाला जी ओढ वाटते त्या प्रवृत्तीवर आपली श्रद्धा आपण पुन्हां प्रस्थापित केली पाहिजे.

[ पुढील मजकूर पान ३७ वर पहा ]








जी. स्टीफन सिंपक्स[1]

# राजकारण आणि नीति यांचें जिवंत ऐक्य

राजकारण आणि नीतिधर्म यांच्या व्याख्या जरी भिन्न असल्या तरी एका अर्थी राजकारण आणि नीतिधर्म हीं एक आहेत. राजकारण आणि नीति यांचें हें ऐक्य प्रत्यक्ष कृतींतून आणि तेंहि कांहीं ठळक व्यक्तींच्या जीवनांतून व कृतींतून सिद्ध होतें. तत्त्वतः राजकारण म्हणजे राज्यकारभाराचें शास्त्र, आणि नीतिशास्त्र म्हणजे असकें बरोबर आणि तसकें चूक असा भेद कां हें सांगणारें शास्त्र. अर्थात् हा भेद सांगतांना अंतिम मूल्यांचाहि विचार येतो, तो प्रस्तुत स्थळीं कर्तव्य नाहीं. पाश्चात्त्यांच्या राजकारणविषयक आणि नीतिविषयक विचारांची घडण दोन अत्यंत प्रभावशाली गोष्टींनीं बनलेली आहे. त्या दोन गोष्टी म्हणजे प्लेटोचें तत्त्वज्ञान आणि बायबलमधील 'गिरिप्रवचन' (Sermon on the Mount). या दोन गोष्टींचा प्रभाव केवळ वाङ्मयीन नाहीं. वाङ्मयसृष्टींतील परस्परांपासून विभिन्न अशा या दोन गोष्टींच्या प्रभावाचें मुख्य कारण त्यांतील विचारगांभीर्य हें आहेच; पण त्याहीपेक्षां ज्या प्रभावशाली वैयक्तिक जीवनांतून हा वाङ्मयीन आविष्कार झाला, त्या जीवनाचा प्रभाव हें मुख्य कारण आहे. प्लेटोबद्दलचा आपला आदर, त्याचा गुरु जो सॉक्रेटिस त्याच्या जीवनाच्या आणि मरणाच्या हृदयस्पर्शी आठवणींमुळें वृद्धिंगत होतो; तर 'गिरिप्रवचन' वाचीत असतांना जीझसचें जीवन आणि मरण आपल्या डोळ्यांसमोर उभें रहातें. याच मर्मस्पर्शी प्रसंगांतून आपणाला राजकारण आणि नीति यांच्या मूलगामी स्वरूपाचें खरें दर्शन होतें. राजकारण आणि नीति यांच्या व्याख्या निराळ्या असतील परंतु त्यांचें अत्यंत सामर्थ्यशाली एकरूपत्व एखाद्या महान् विभूतीच्या समर्पित आणि भावोत्कट जीवनांतूनच आपणांस प्रतीत होतें.

## नीतीचें द्विविध स्वरूप

नीतीचें स्वरूप द्विविध आहे. एक प्रचलित रूढी आणि प्रस्थापित कायदे यांच्या द्वारां व्यक्त होणारी नीति. सामाजिक व्यवहाराला जें कांहीं किमान नियंत्रण लागत असतें तें या नीतीनें होत असतें. परंतु या नीतीचें स्वरूप हें केवळ तटस्थ, स्थितिशील, निष्क्रिय असतें. रूढीला धक्का लावणाऱ्या कोणत्याहि शुभ प्रेरणेला ही नीति विरोध करते. दुसऱ्या प्रकारची नीति ही प्रगतिशील असून तीच खरी नीति या नांवाला योग्य आहे. खरें नैतिक जीवन म्हणजे एक अविरत अखंड अशी साधना

---

१ जी. स्टीफन सिंपक्स एम्. ए., पी एच.डी. हे सुप्रसिद्ध 'हिबर्ट जर्नल' चे संपादक आहेत. ते युनिटेरिअन पंथाचे आहेत. त्यांनीं विश्वभारतीच्या 'Gandhi Memorial Peace Number' (२ ऑक्टो. १९४९) करितां लिहिलेला Politics and Morality हा लेख त्या विशेषांकांत प्रसिद्ध झाला आहे. त्या मूळ इंग्रजी लेखाचाच स्वैर अनुवाद वरील लेख आहे— सकृद्दर्शनीं भिन्न वाटणारीं राजकारण आणि नीति यांना गांधीजींसारख्या विभूतीच्या जीवनांत कसें जिवंत एकरूपत्व प्राप्त होऊं शकतें याचें लेखकानें तात्त्विक, बुद्धिनिष्ठ आणि ऐतिहासिक भूमिकेवरून विवेचन केलेलें आहे.— का. सं.



अनुक्रमणिका








आहे. त्यांत पूर्वीपेक्षां अधिक चांगल्या रीतीनें वागणें एवढ्याचाच समावेश नसून अमकें बरें आणि अमकें वाईट हें ठरविण्याची जी नैतिक कसोटी तिचें क्षेत्र अधिकाधिक विस्तृत करणें, ती नैतिक कसोटी जीवनांतील निरनिराळ्या व्यवहारांना लावणें, ह्याचाहि समावेश होतो. बदल, प्रगति व क्रांति यांना रूढ नीतिकल्पनांमध्यें जागा नसते. परन्तु नैतिक जीवनाची मौजच अशी असते कीं, जर रूढ नीतीला विरोध केला नाहीं, तर ती रूढ नीति जुलमी बनते. ज्या सद्गुणांचें तिनें पालन करावयाचें त्या सद्गुणांचीच ती उपेक्षा करूं लागते. आणि अशा रीतीनें ही रूढ नीतीच अनीतिमान् बनूं लागते. अशा या रूढ नीतीला धक्का देऊन तिच्याऐवजी गतिमान् क्रांतिशील नीतीची प्रस्थापना करावयाची झाल्यास एखाद्या महान् क्रांतिकारकाची, प्रेषिताची, किंवा संताची गरज लागते. अशा नैतिक क्रांतिकारकाला आपलें कार्य करावयाला मुख्य क्षेत्र म्हणजे सामाजिक संबंध ज्यांत व्यक्त होतात असें क्षेत्र, म्हणजेच राजकारण हें होय. नीति ही जर खरी प्रगतिशील व्हावयाची असेल तर ती राजकारणाच्या क्षेत्रांतच होऊं शकेल. आज राजकारणानें आपला व्याप एवढा वाढविला आहे कीं, त्याचा आपल्या जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रांत प्रवेश झाला आहे.

### आधुनिक यंत्रसंस्कृतीला आह्वान

महात्मा गांधीजी राजकारणी होते कीं संत होते, त्यांच्या व्यक्तिमत्त्वांत राजकारणी मुत्सद्दीपण किती प्रमाणांत होतें आणि साधुत्व किती प्रमाणांत होतें, यासंबधीं आतांपर्यंत बरीच चर्चा झाली आहे आणि तीहि कित्येक वेळां फार तावातावानें झालेली आहे. परंतु गांधीजींच्या जीवनांतील क्रांतिकारक बाजू जर आपण पाहिली, त्यांची प्रगतिशील नीति जर आपण लक्षांत घेतली, तर नीति आणि राजकारण हीं फक्त जिवंत विभूतीच्या जीवनांतच कशीं एकरूप होतात याची साक्ष व सत्यता आपणांस पटेल. गांधीजींनीं आपल्या जीवनांत अमकें राजकारण आणि अमकी नीति असा सांचेबंद फरक केव्हांच केला नाहीं. राजकारणाच्या क्षेत्रांतील त्यांचे प्रयत्न कोट्यवधि स्त्री-पुरुषांचें जीवनमान सुधारण्यावर केन्द्रित झाले होते. नीतिधर्माच्या क्षेत्रांतील त्यांच्या प्रयत्नांचें लक्ष्य, त्याच कोट्यवधि स्त्री-पुरुषांच्या जीवनांतील सदसद्विवेक हा अधिक व्यापक व तीव्रतर करावा, हें होतें. हल्लींच्या जमान्यांत प्रजाजनांच्या बाह्य शारीरिक व भौतिक सुखसोयी राज्यसंस्थेच्या कार्यक्षम नियंत्रणावर अवलंबून असतात. परंतु त्याच प्रजाजनांच्या स्वयंस्फूर्त नैतिक जीवनाकरितां अनुकूल परिस्थिति निर्माण करावयाची असेल तर, गांधींसारख्या प्रगतिशील नीतिमत्तेच्या विभूतींकडून त्या राज्यसंस्थेला वारंवार आह्वान मिळणें अत्यंत आवश्यक असतें.

इतिहासांतील अत्यंत सामर्थ्यशाली आणि नीतिमान् अशा एका महान् विभूतीचें आह्वान म. गांधींच्या रूपानें आधुनिक यंत्रोद्योगप्रधान समाजरचनेला मिळालें. अशा प्रकारचें हें आह्वान कांहीं पहिलेंच नव्हे. परंतु या वेळचा विशेष हा कीं, या आह्वानाच्या पाठीशीं संपूर्ण आत्मार्पण करावयास तयार असलेल्या महात्म्याचें, महान् ऊर्जस्वल असें व्यक्तिमत्त्व उभें ठाकलें होतें. अशाच निर्वाणींच्या प्रसंगीं इतिहासाचा प्रवाह बदलून त्याला प्रगतिशील नीतीचें इष्ट तें वळण लागत असतें.

गतानुगतिक रूढिग्रस्त नीतीमुळें लोकांत आत्मसंतुष्टता, स्वयंतृप्तपणा व जाड्य उत्पन्न होऊन राजवटीचें रूपांतर राजकीय झोटिंगशाहींत होतें. त्याला धक्का देऊन, लोकमतांत क्रांति करून लोकांची प्रगतिशील नीतिमत्ता जागृत करण्याचें कार्य नीतिमान् विभूतीकडूनच होत असतें. आणि ही नीतिमान् विभूति संताच्या किंवा साधुपुरुषाच्या रूपानें अवतीर्ण होत असते. संताची किंवा साधूची धार्मिक व्याख्या कांहींहि असो; पण या बाबतींत एकवाक्यता होऊं शकते कीं, संताचें जीवन हें एका दिव्य प्रेरणेनें भरलेलें सदाचारसंपन्न असें जीवन असतें. उच्च नीतिमत्तेचे आदर्श असे हे संत अवनत समाजाच्या रूढ नीतीविरुद्ध बंड उभारून एका उन्नत प्रगतिशील नीतीचें ध्येयदर्शन समाजाला घडवून आणतात. हें ध्येयदर्शन सकृद्दर्शनीं प्रचलित रूढ नीतीच्या आवांक्याबाहेरचें, फार दूरचें वाटतें. त्यामुळें साधुपुरुषाचा नीतिधर्म हा त्याच्या समकालीनांना नेहमींच अव्यवहार्य वाटत असतो. साम्राज्याचा नीतिधर्म–मग तें साम्राज्य अमेरिकेचें







असो, इंग्लंडचें, रशियाचें वा जपानचें असो—आणि साधूंचा नीतिधर्म हे एक कसे असूं शकतील ? जर ते एक असते, तर साम्राज्येंहि झालीं नसतीं आणि संतहि झाले नसते ! —

**मनुष्य हा साध्य का साधन ?**

ज्यांच्या हातीं देशाचें राजकीय भवितव्य आहे अशांना संपूर्णपणें नैतिक बनतां येत नाहीं. म्हणूनच अत्यंत उच्च असा नीतीचा आदर्श आणि प्रत्यक्ष नैतिक व्यवहार यांमध्यें राजकारणांत नेहमींच संघर्ष दिसून येतो. आपल्या हल्लींच्या राजकीय आणि सामाजिक संकटपरंपरेच्या बुडाशीं हाच नीति आणि व्यवहार यांमधील संघर्ष आहे. पौर्वात्य व पाश्चात्य कोणताहि समाज घ्या, त्यांत दोन प्रकारच्या विचारसरणींचे लोक असतातच. एक विचारसरणी अशी कीं साध्य चांगलें असलें कीं, साधन बरेंवाईट कसें का असेना, त्या साधनाबद्दल विधिनिषेध बाळगण्याचें कारण नाहीं. दुसरी विचारसरणी अशी कीं, साधनांनींच साध्याची घडण होत असते; म्हणून साधनांचा साध्यावर अत्यंत दूरगामी परिणाम होत जातो; इतका कीं, कित्येक वेळां इष्ट जें मूळ साध्य तेंच नष्टप्राय होतें ! या दोन विचारसरणींमधील संघर्ष हा हल्लींचा आपल्या समाजाचा कायमचा रोग-( endemic )च होऊन बसला आहे. पहिल्या विचारसरणीप्रमाणें या अपौरुषेय ( impersonal ) विराट् विश्वरूपी यंत्रांत मनुष्य म्हणजे केवळ एका स्क्रूप्रमाणें किंवा चाकाच्या दांत्या-( cog ) प्रमाणें आहे; मग त्या यंत्राच्या कल्पनेच्या बुडाशीं आर्थिक, ऐतिहासिक किंवा विरोधविकासवादी ( Dialectical )—कोणतीहि उपपत्ति असो ! दुसऱ्या विचारसरणीप्रमाणें, मनुष्य हा स्वतः कशाचें साधन किंवा उपांग नसून तोच स्वतः साध्य ( An end in himself ) आहे. अशा या दोन विचारसरणींमधील द्वंद्वांतच खरोखरी आजच्या सर्व राजकीय मतभेदांचें, राजकीय संघर्षाचें रहस्य आढळून येतें.

मनुष्य हाच एकमेव ' पुरुषार्थ ' आहे, आपलें परम उद्दिष्ट आहे, अशी संतमहात्म्यांची दृढ श्रद्धा असते; मग तो मनुष्य दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी असो, 'घेटों'त रहाणारा ज्यू असो, भांडवलशाहींतील बेकार मजूर असो, कीं समाजवादी राज्यांतील मतभेद व्यक्त करणारा बुद्धिवादी असो ! जे व्यवहारवादी आहेत—आणि आपण बहुतेक सर्वजणच तसे आहोंत—त्यांना या संतांचा राजकीय कार्यक्रम साहजिकच अव्यवहार्य वाटतो. आपणांपैकीं बहुतेकांना म. गांधींचा चरखा केवळ प्रतीकात्मक वाटला. त्यानें आपले प्रश्न सुटतील असें कधींच वाटलें नाहीं. परंतु कित्येक वेळां हींच प्रतीकें—मग तीं चरख्याचीं असोत कीं हातोड्याचीं वा कोयत्याचीं असोत—इतकीं सामर्थ्यशाली बनतात कीं त्यांच्यासमोर औद्योगिक उत्पादनाच्या मोठमोठ्या कार्यक्षम साधनांना देखील नमावें लागतें !

**संतांचें अभिनव तंत्र**

हींच प्रतीकें उच्च नीतिमत्तेच्या आदर्शाचें पालन करणाऱ्या संतमहात्म्यांच्या हातांत बलाढ्य अस्त्रें बनून त्यांच्यांत विस्मयकारक सामर्थ्य उत्पन्न होतें. हें विस्मयकारक अतिभौतिक सामर्थ्य कसें उत्पन्न होतें ? वाईट समजल्या जाणाऱ्या माणसाच्या ठिकाणींहि सुप्त असलेल्या सत्प्रवृत्तींना आवाहन करून, त्या माणसाच्या ठिकाणीं चांगुलपणाबद्दल आकर्षण एखादा सज्जन निर्माण करूं शकतो. सज्जनाच्या या शक्तींतून हें अतिभौतिक सामर्थ्य उत्पन्न होतें. सर्वच माणसांमध्यें सत्प्रवृत्ति सुप्त स्वरूपांत कमीअधिक प्रमाणांत असते. प्रत्येकाला आपण साधुवृत्ति व्हावें असें वाटतें. अशी जर प्रकट-अप्रकट इच्छा नसती तर आजपर्यंत युगानुयुगें संतांबद्दलचें जें असामान्य आकर्षण सामान्य माणसांनाहि वाटत आलेलें आपण बघतों, त्याची उपपत्ति लागणार नाहीं. सामान्य माणसेंहि आध्यात्मिक जीवनाच्या उच्च पातळीवर जाण्याचा सदैव प्रयत्न करीत असतात हें आपण पाहतों. संतांच्या प्रेरक संपर्काशिवाय, आपण होऊन तीं तो प्रयत्न करूं शकलीं नसतीं ! राजकारणाचें तरी उच्चतम साध्य कोणतें ? सामान्य स्त्री-पुरुषांना आपला नैतिक विकास साधतां येईल, अशी त्यांच्या जीवनांत अनुकूल परिस्थिति निर्माण करणें ह्याशिवाय राज्यसंस्थेचें दुसरें कोणतें परमोच्च ध्येय असूं शकतें ? अर्थातच संतमहात्मे अशा अनुकूल परिस्थितीची








वाट पहात बसत नाहींत. सामाजिक जडता आणि विरोध यांनीं बुजबुजलेल्या प्रतिकूल, हट्टी परिस्थितीवर मात करून ते आपलें 'संतपण', किंवा 'महात्मेपण' हिसकावून घेत असतात! समकालीनांचा विरोध हीच संतांच्या यशाची कसोटी असते, हें सत्य आपण लक्षांत ठेविल्याशिवाय संतमहात्म्यांचें ऐतिहासिक माहात्म्य आपणांस समजणार नाहीं. जगांतील गरीब-दुबळे व रंजलेले-गांजलेले जे लोक, त्यांनाहि पृथ्वीवरील बिपुलतेचा वांटा मिळावा, त्यांची सामाजिक अन्यायापासून आणि प्राचीन वा अर्वाचीन गुलामगिरीपासून मुक्तता व्हावी ह्या तळमळीनें प्रेरित होऊन हे संत एका आश्चर्यकारक तंत्राचा अवलंब करतात! सगळ्या माणसांना जीवनांतील चांगल्या गोष्टी मिळाव्या म्हणून हे संत स्वतःच्या जीवनांत आधिभौतिक गोष्टींचा त्याग करून दाखवितात. सामान्य माणसांना जीं मूल्यें प्यार असतात—उ० पैसा, सुरक्षितता, कीर्ति इ.—तीं मूल्यें हे संत कस्पटासमान लेखून त्यांच्यावर पाणी सोडतात. त्या त्या काळच्या तथाकथित मूल्यांची पुंजी तृणवत् मानून तत्कालीन मूल्यमापनांत भयंकर उलथापालथ घडवून आणणारे हे संत राजकारणावर दूरगामी परिणाम घडवून आणतात. असीम त्यागाचें किंवा आत्मार्पणाचें शस्त्र ज्यांनीं धारण केलें आहे, विश्वांतील सत्-शक्तीवरील अचल श्रद्धेचें कवच ज्यांनीं घातलें आहे, अशा या संतांपुढें छळ, कारावास किंवा मृत्यु यांचीहि मात्रा चालूं शकत नाहीं.

### मूक जनतेच्या इच्छा साकार होतात

प्रत्यक्ष राजकीय परिणामांच्या दृष्टीनें गांधीजींच्या कामगिरीचें मोजमाप करणें अत्यंत कठिण आहे. दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी मजुरांचा प्रश्न अजूनहि अनिर्णीत आहे. गांधीजींच्या इच्छेविरुद्धच हिंदुस्थानची फाळणी झाली. त्यानंतर पूर्वेकडील आणि अतिपूर्वेकडील देशांतून राष्ट्रवादानें पुन्हां जोराची उचल खाल्ली असून, अत्याचार आणि हिंसा यांचें वातावरण वाढतच आहे. अशा परिस्थितींत गांधीजींच्या जीवनांतील राजकारण आणि नीतिधर्म यांच्या एकरूपत्वाचे परिणाम तत्काल दृग्गोचर होणें कठिण आहे.

परंतु राजकीय परिणामापेक्षांहि एक अधिक महत्त्वाची गोष्ट आपण लक्षांत घेतली पाहिजे. आपल्या भोंवतालच्या कोट्यवधि दीनदुबळ्या पददलित जनतेच्या अव्यक्त आकांक्षांना, अनिर्दिष्ट आशांना संत किंवा साधुपुरुष आपल्या जीवनांत, स्वतःच्या विचार-उच्चार-आचारांनीं व्यक्त रूप देत असतो, साकार करीत असतो. बिचाऱ्या मूक जनतेला आपलें नैतिक वैफल्य, स्पष्ट विचारसरणीनें किंवा सडेतोड कृतीनें सार्वजनिक निषेधाच्या रूपानें, आपण होऊन प्रकट करण्याचें धैर्य नसतें. चळवळ्ये राजकीय पुढारी किंवा हुकुमशहा यांना जें यथातथ्य रीतीनें प्रकट करणें शक्य नसतें, तें संत-मनुष्य निःस्पृह रीतीनें प्रकट करीत असतो. म्हणूनच जनतेला अशा संतमहात्म्यांची गरज असते. त्यांच्या आधारावर सामान्य लोकहि उच्च नीतिमत्तेची पातळी गाठूं शकतात, असीम संयम प्रकट करतात, आणि प्रसंगोपात्त अशा प्रकारचा निःशस्त्र प्रतिकार करून दाखवितात कीं, ज्या प्रतिकारापुढें आधुनिक युद्धाचें तंत्रहि लटकें पडतें! जो नीतिधर्म सर्व लोक आचरूं शकतील, असाच नीतिधर्म संत आपल्या जीवनांत स्वतः आचरून दाखवितात. एरव्हीं, संतांच्या जिवंत उदाहरणाशिवाय तो नीतिधर्म आचरून दाखविणें सामान्य, संसारी, विषयाभिमुख माणसाला अशक्य असतें!

एका अर्थी गांधीजी हे जगांतील मुक्या दीनदुबळ्या, पददलित जनतेच्या सद्सद्विवेकबुद्धीचे प्रतिनिधीच (vicarious conscience) होते. देशोदेशींच्या नभोवाणीकेन्द्रांच्या जाळ्यांतून भिन्नभिन्न राजकीय घोषणांचे निनाद दुमदुमत असतांना, त्यांच्यामधूनहि स्पष्ट ऐकूं येणारा असा जर कोणाचा आवाज असेल तर तो गांधीजींचा. त्यांच्या रूपानें दीनदुबळ्यांचा आवाज ऐकूं येत होता. एका सदाचारसंपन्न जीवनाचा मानवजातीच्या राजकीय जीवनावर केवढा प्रभाव पडूं शकतो याचें चालतें-बोलतें प्रत्यंतर जर कोणा पिढीला अनुभवायला मिळालें असेल, तर तें आपल्या पिढीला गांधीजींच्या रूपानें मिळालें.

### गांधीजींचें मार्गदर्शन

गांधीजींच्या नैतिक व्यक्तिमत्त्वाच्या परिणामांची










चर्चा भारतीय करतील यांत नवल नाहीं. पण त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचें महत्त्व पाश्चात्यांच्या दृष्टीनेंहि अपरिमित आहे. एका बाजूला ऐतिहासिक ख्रिश्चन धर्माची नीतिमूल्यें आणि दुसऱ्या बाजूला विरोधविकासवादी तत्त्वज्ञानाचीं व्यक्तिनिरपेक्ष मूल्यें यांच्यामध्यें संकुल संघर्ष हल्लीं पाश्चात्य देशांतून चालू असून तो संघर्ष पाश्चात्यांच्या जीवनांत अधिकाधिक उग्रपणें दिसून येत आहे. पण ह्याहीपेक्षां या संघर्षाचें अधिक उग्र आणि निःसंदिग्ध स्वरूप दोन विशिष्ट विचारसरणींमध्यें दिसून येतें. माणसाला माणूस म्हणूनच मूल्य आहे असें मानणारी एक विचारसरणी; आणि माणसाला स्वतःचें असें मूल्य नसून त्याच्यावर राज्य करणाऱ्या राज्यसंस्थेचा तो किती प्रमाणांत कार्यक्षम घटक आहे यावरच त्याचें मूल्य अवलंबून आहे, असें मानणारी दुसरी विचारसरणी. खाजगी उद्योगधंदे चांगले कीं वाईट, राजकीय लोकशाहींत गुणावगुण कोणते, यासंबंधीं खरा वाद नसून, व्यक्तीचें समाजांतील स्थान काय हाच वादाचा मुख्य मुद्दा आहे.

नेमक्या याच मुद्द्यावर हल्लींच्या नैतिक गोंधळांत गांधीजींचें नैतिक जीवन पाश्चात्यांना मार्गदर्शन करूं शकेल. उत्पादन आणि नफा यांत नखशिखान्त बुडालेल्या भांडवलशाहीला गांधीजींचें जीवन बुझालेली आठवण पुन्हां करून देईल कीं, शेवटीं शरीर हें वस्त्रापेक्षां आणि जीवन हें द्रव्यापेक्षां श्रेष्ठ आहे! विरोधविकासवादी तत्त्वज्ञान्यालाहि, एका व्यक्तीचा मानवजातीच्या प्रगतीमध्यें केवढा श्रेयाचा वांटा असूं शकतो याबद्दल, गांधीजींचें जीवन आपल्या जिवंत उदाहरणानें जोरानें विचार करावयाला लावील! विरोधविकासवाद्यांनीं तें श्रेय व्यक्तीला देऊं नये हें खरोखर चमत्कारिकच म्हटलें पाहिजे. त्यांच्या तत्त्वज्ञानांत सामाजिक इतिहास हा आर्थिक कारणांनीं बनतो या गोष्टीवर विशेष भर असतो. पण त्यांत मौज ही कीं, ह्या तत्त्वज्ञानाचा जनक जो कार्ल मार्क्स त्याला त्याच्या जीवनांत कोणत्याहि आर्थिक सोयी उपलब्ध नव्हत्या. उलट, त्याला आपल्या मित्राकडून पैसे उसने घ्यावे लागत होते आणि ते त्यानें कधीं परतहि केले नाहींत, कीं त्याबद्दल आभारहि मानले नाहींत!

लंडनच्या गच्च भरलेल्या स्मशानभूमींत कार्ल मार्क्सचें थडगें इतकें साधेंसुधें आहे कीं, त्याच्या आजूबाजूस असलेल्या अनेक भव्य संगमरवरी थडग्यांच्या गर्दींत, त्याकडे कोणाचें लक्षहि जाणार नाहीं! पण त्याच साध्यासुध्या थडग्यांत कायमची विश्रान्ति घेत असलेल्या पुरुषाची छाप आज जगाच्या एक तृतीयांश लोकसंख्येवर पडली आहे! महात्मा गांधींनीं जग हलवून सोडणारें असें कोणतेंही पुस्तक लिहिलें नाहीं, कीं तशी मोठी 'क्रान्ति 'हि करून दाखविली नाहीं! पण त्यांचें जीवन जगाला सारखी आठवण करून देत राहील कीं, मानवी जीवनालाहि आध्यात्मिक अधिष्ठानाची गरज आहे. जीझस उदरांत असतांना जीझसच्या मातेनें जे उद्गार काढले त्यांचा पाश्चात्यांना विसर पडलेला आहे. तिनें असे उद्गार काढले होते: "त्यानें मोठमोठ्या बलाढ्यांना आसनांवरून खालीं ओढलें आणि जे नम्र आणि लीन आहेत त्यांना उच्च पदीं प्रस्थापित केलें. भुकेल्यांना त्यानें सुग्रास खाऊं घातलें आणि श्रीमंतांना रिकामें करून रवाना केलें". हे उद्गार 'लाल निशाणा 'पेक्षांहि अधिक क्रांतिकारक नाहींत का! मार्क्स किंवा लेनिन यांच्या तत्त्वज्ञानापेक्षां ख्रिस्तधर्माचीं मूलतत्त्वें अधिक समाजवादी आहेत. कारण त्या तत्त्वानुसार प्रत्येक जीव हा जीव म्हणून, व्यक्ति म्हणून, पवित्र आहे.

## लेनिन, रुझव्हेल्ट कीं गांधी ?

गांधीजींनीं गीतेसारखाच 'न्यू टेस्टॅमेंट 'चाहि अभ्यास केला होता, हा केवळ आकस्मिक योगायोग नव्हे. म. गांधींनीं ब्रिटिश राजकारणावर जो प्रभावशाली परिणाम घडवून आणला त्यामुळें पाश्चात्यांच्या ख्रिस्तधर्माला खरा जिवंतपणा प्राप्त होईल. संपत्तीबद्दलच्या अवास्तव हव्यासानें परंपरागत ख्रिस्ती धर्माला जी कीड लागली आहे, ती महात्मा गांधींच्या उदाहरणानें नष्ट होऊन तो धर्म शुद्ध होण्याचा संभव आहे. एका बाजूला भांडवलशाही आणि दुसऱ्या बाजूला समष्टिवाद (collectivism) यांचा जर यशस्वी रीतीनें प्रतिकार करावयाचा असेल तर त्याला गांधींचें स्वेच्छेनें अंगीकारिलेलें दारिद्र्य किंवा अपरिग्रहव्रत हाच खरा उपाय आहे.








## राजकारण आणि नीति यांचें जिवंत ऐक्य

म्हणून जगांतील खरा झगडा हा पुष्कळ लोकांना वाटतो तसा समाजसत्तावाद आणि भांडवलशाही यांमध्यें नाहीं. एका बाजूला प्रगतिशील नीतिधर्म आणि दुसऱ्या बाजूला राजकारणानें नीतिधर्माला घातलेली व्यवहाराची मुरड यांमध्यें खरा झगडा आहे. आपल्या घराच्या बागेंतील थडग्यांत विश्रांन्ति घेत असलेला रूझवेल्ट, मॉस्कोच्या लाल चौकांत कांचेच्या शवपेटींत भरून ठेवलेला लेनिन आणि जगांतील सर्व सागरांना भारतीय पवित्र नद्यांच्या मुखांनीं जाऊन मिळालेल्या महात्म्याच्या अस्थी किंवा रक्षा—या तिन्हींपैकीं कोणाचा प्रभाव पुढें टिकून रहाणार आहे, हें पुढील इतिहासकारच ठरवितील.

---

## जेफर्सन आणि गांधी ( पान ३१ वरून पुढें चालू )

जेफर्सनप्रमाणेंच गांधीजींना देखील राजकारण हें नीति आणि धर्म यांचेंच एक अंग वाटत असे. परंतु जेफर्सनपेक्षां गांधीजींचे नीतिविषयक विचार अधिक क्रांतिकारक आणि त्यांच्या धर्मविषयक कल्पना अधिक वस्तुनिष्ठ असल्यामुळें, ते जेफर्सनच्याहि पुढें गेले. त्यांनीं आर्थिक आणि राजकीय विकेन्द्रीकरणाचा आणि लष्करी शस्त्राऐवजीं सत्याग्रहाच्या शस्त्राचा पुरस्कार केला. जेफर्सनची योजना जशी अमलांत आली नाहीं, तशी गांधीजींचीहि अंमलांत आली नाहीं. पण त्यामुळें आपलें व आपल्या भावी पिढ्यांचेंच अतोनात नुकसान झालें आहे !

---

## सा भा र स्वी का र

**गांधीवाद : समाजवाद** ( एक तुलनात्मक अभ्यास )—संपादक : भाऊ धर्माधिकारी. आचार्य जावडेकर यांच्या प्रस्तावनेसह, १३२ पानें. प्रकाशक – महाराष्ट्र ग्रंथभांडार, कोल्हापूर. ( १९४९ ). किंमत ३ रु.

**आधुनिक नागरिकशास्त्र** — प्रा. गो. मा. कुलकर्णी. वीणा प्रकाशन, नागपूर. ( १९५० ). पानें २४२. मूल्य ३॥ रु.

**श्री. ज. स. करंदीकर यांचे निवडक लेख व निबंध** ( खंड १ ला )—आ. रा. भट, संयोजक, ज. स. करंदीकर सन्माननिधि, केसरी-कार्यालय, पुणें २. पानें २९२. ( १९५० ) मूल्य ६ रु.

**प्रीतीची रीत** (कादंबरी) — विठ्ठल सीताराम गुर्जर. प्रकाशक. के. भि. ढवळे श्रीसमर्थसदन, गिरगांव मुंबई ४. ( १९४९ ) पानें ३३८. मूल्य ५॥ रु.

**चित्रा** ( स्वतंत्र सामाजिक कादंबरी ) — वा. कृ. गलगली. प्रकाशक : के. भि. ढवळे, श्रीसमर्थसदन, गिरगांव, मुंबई ४. ( १९४९ ). पानें १४६. मूल्य ३॥ रु.

TOWARDS FREEDOM ( from anti - Imperialism to Scientific Humanism ) - by S. R. Sunthankar, B. A. LL. B.; with two Appendices (i-ix); published by Ajit Agency, Belgaum (1948). pp. 117 Price. Rs. 3.

---








श्री. ना. ग. जोशी

# भारतीय संस्कृति आणि शास्त्रीय दृष्टि

१५ ऑगस्ट १९४७ या दिवशीं हिंदराष्ट्राच्या स्वातंत्र्याच्या कारकीर्दीला सुरुवात झाली. अशोकाच्या धर्मचक्रानें सुशोभित असा तिरंगी ध्वज आपला राष्ट्रध्वज म्हणून सर्वत्र फडकूं लागला आणि हिंदुस्थानांत एक नवीन युग सुरू झालें. स्वतंत्र हिंद राष्ट्राला शुभ संदेश पाठविणाऱ्यांनीं भारताच्या पूर्वकालीन संस्कृतीचा प्रामुख्यानें उल्लेख केला आणि त्या वैभवशाली वारशाचा फायदा घेऊन स्वतंत्र भारत आशियांतील राष्ट्रांत पुन्हां एकदां प्रामुख्यानें चमको म्हणून यश चिंतिलें. अशा तऱ्हेनें आपणा सर्वांचीं मनें गतकालांतील सांस्कृतिक महत्त्वाच्या जाणिवेनें थरारलीं. अशोकाच्या धार्मिक दिग्विजयाच्या भूमिकेवर नवभारताची भविष्यकालीन सुखस्वप्नें मोठीं मोहक वाटूं लागलीं. जणू काय करावयाचें तें आपण पूर्वींच साध्य केलें होतें ! मधला मध्ययुगाचा अंधार सोडला तर आम्हीं मोठेच आहोंत अशी ईर्षा मनांत उत्पन्न होण्यासारखी परिस्थिति आली होती. आणि या मनःस्थितींत तुलनेची वेळ आली तर, आम्हीं खुशाल अशा आत्मतुष्टतेच्या वृत्तीनें वागूं लागलों कीं, आधुनिक सुसंस्कृत जगानें जी उच्चता, जी सभ्यता ( civilization ) व जी संस्कृति ( culture ) महाप्रयासानें प्रस्थापित केली आहे तिच्याहून अधिक श्रेष्ठ दर्जाची सुधारणा व संस्कृति आम्ही गांठली होती. या आत्मतुष्ट विधानाच्या पुष्ट्यर्थ आम्हीं जुन्या ग्रंथांचीं नावें देतों, कित्येक अर्धवट काल्पनिक गोष्टींचा पाढा वाचतों, तत्कालीन विज्ञानशास्त्रांतील तथाकथित प्रगतीची ग्वाही देतों आणि सर्वांत शेवटीं बिनतोड प्रतिवाद म्हणून आमच्या आध्यात्मिक पराकाष्ठेची पुनरुक्ति करून आधुनिक संस्कृतीला अगदीं चारी मुंड्या चीत केल्यानें समाधान मानीत चूप राहतों. आधुनिक सुधारणेचें अर्धवट आकलन, प्राचीन संस्कृति सुधारणाबद्दलची अगदीं काल्पनिक समजूत, ज्ञान विज्ञानांतील गतिशीलतेच्या जाणीवेचा अभाव यांमुळेंच कित्येक अजब भ्रम आपल्य डोक्यांत घर करून राहिले आहेत. सर्वांआधीं ते काढून टाकावयास पाहिजेत आणि त्यासाठीं आपण शास्त्रीय दृष्टि अंगीं बाणविणें अत्यावश्यक आहे.

## आमच्या ‘ अस्मिते ’नें धारण केलेलें विकृत रूप

आपल्या पूर्वकालीन श्रेष्ठतेवरचें दिव्यत्वाचें पटल जरासें दूर करून पाहिल्यास त्या कांळीं आपली संस्कृति व सुधारणा बरीच झाली होती असें आढळून येतें. त्या वेळीं आजच्यासारखीं प्रयोगनिष्ठ ज्ञानसंशोधनाचीं साधनें नव्हतीं. तरी सुद्धां केवळ मानवी डोळ्यांना जें दिसणें शक्य आहे व मानवी बुद्धीला कल्पितां येणें जें संभवनीय आहे अशा कल्पनानिष्ठ ( speculative ) ज्ञानक्षेत्रांत आपण त्या काळच्या तुलनेनें खूपच प्रगति करूं शकलों होतों. निरीक्षणाच्या साधनानें, वेधशाळांच्या द्वारें बरीचशी खगोलविषयक माहिती ( data ) गोळा केली होती. अंकगणित व बीजगणित यांच्या बाबतींत त्या काळच्या पुढारलेल्या अरब राष्ट्रांपेक्षांहि आम्हीं अधिक प्रगत होतों. औषधिविषयक रसायनशास्त्र आमच्या परिचयाचें होतें, पण त्या बाबतींत अरब लोक अधिक साहसी होते. आमच्या सिंधुतटावरील व गंगातटावरील सुधारणांमध्यें साधलेली शास्त्रीय प्रगति अशा तऱ्हेची होती. पदार्थविज्ञानाच्या बाबतींत तर्कप्रधान कल्पनावादच प्रमुख होता. परंतु








अनुक्रमणिका

त्या काळींहि अणुरेणुविषयक जी तात्त्विक चर्चा झाली ती आजच्या प्रयोगनिष्ठ भौतिकशास्त्रानें प्रस्थापित केलेल्या अणुविषयक सिद्धान्तांकडे पाहतां, आश्चर्यकारकच म्हटली पाहिजे. सामाजिक शास्त्रांची वाढहि त्या काळच्या मानानें बरीच झाली होती. अर्थशास्त्र आजच्या अर्थानें त्या काळीं माहीत नव्हतें पण राज्यशासन प्रगत होतें. आजच्या समाजशास्त्राची जागा त्या काळीं कायदाविषयक धर्मशास्त्रानें घेतली होती. मनुयाज्ञवल्क्यादि स्मृतिकारांनीं याची ग्वाही दिलेलीच आहे. पण आजच्या काळीं शास्त्रांच्या वाढीमुळें जी एक सार्वत्रिक बुद्धिनिष्ठ वृत्ति निर्माण झाली आहे तशी ती त्या काळीं सार्वत्रिक होती असें म्हणतां येणार नाहीं. आजचे समाजशास्त्रज्ञ जसे प्राणिशास्त्रांतर्गत अनुवंशशास्त्रांतील प्रयोगांवर आधारलेले सिद्धान्त मांडतील तसे ते त्या काळीं मांडले गेले होते असें मानणें वेडेपणाचें ठरेल. कारण आजचें शरीरविज्ञान व सुप्रजाशास्त्र त्या काळीं अस्तित्वांत नव्हतें. त्या काळचे तर्क स्थूल अनुभवावर आधारलेले होते. असें असूनहि, सर्वस्वीं वैज्ञानिक दृष्टीनें 'नोबेल' पारितोषिक मिळविणारे डॉ. ॲलेक्सिस् कॅरेल यांनीं 'मॅन दि अन्नोन' या पुस्तकांत मांडलेल्या एखाद्या मानवसंशोधनविषयक आंतरराष्ट्रीय प्रयोगशाळेची कल्पना पूर्वी मनुयाज्ञवल्क्यांनीं प्रयोगांनीं कृतींत आणली होती किंवा आणली असली पाहिजे, असे उद्‌गार काढण्यापर्यंत कांहींची मजल जाते. आजच्या काळीं उपलब्ध असलेलीं सर्व शाखोपशाखांचीं प्रयोगसज्ज ज्ञानविज्ञानें त्या काळीं साध्य झालीं होतीं असें म्हणण्यासारखें कालविपर्यासी हें नव्हे का ?

ज्या वेळीं शस्त्रक्रियेची अवस्था बव्हंशानें रानटी, ओबडधोबड स्वरूपाची होती आणि म्हणून अंतर्गत शरीररचना व रुधिराभिसरणाची माहिती फारशी झालेली नव्हती, जैव-रसायन म्हणून वाढलेलें शास्त्र दृष्टिपथांतहि नव्हतें, तेव्हां आजच्या शारीरविज्ञानाला माहीत असलेले रक्तांतील सूक्ष्मतम भेदाभेदांचे प्रकार आम्हीहि कल्पनेनें ताडले होते असें मानणारे महाभाग आहेत याला काय म्हणावें ? आजच्या अणु-भौतिकशास्त्राच्या आधारें सूक्ष्म प्रकाशलेखनाच्या साहाय्यानें आणि नवीन अजस्र दूरदर्शक यंत्रांच्या द्वारां जिथें अतिदूरच्या ग्रहांवरच्या वायुमानाचे सिद्धान्त मांडले जातात, जिथें स्वयंचालक विद्युद्‌बाणांच्या–रॉकेट्सच्या–साहाय्यानें स्वयंलेखक यंत्रावर फेरफार नोंदविले जाऊन वातावरणाचें संशोधन केलें जातें, तिथें आम्हांलाहि वातावरणांतील सात थर आजच्याइतके ज्ञात होते असें कालिदासादींच्या काव्यांतील केवळ स्थूल उल्लेखावरून गृहीत धरणारे पंडित पाहिले, म्हणजे आपल्या 'अस्मितेनें' धारण केलेल्या विकृत रूपाची कींव येते ! अणुस्फोटाच्या यशस्वी प्रयोगांमुळें व रेडियम–आदिक स्वयंस्फोटक किरणोत्सारी (रेडियो–ॲक्टिव्ह) धातूंच्या शोधांमुळें भौतिक शास्त्रांतील प्रकाश व उष्णता या विभागांत फोटॉनच्या अस्तित्वासारखे जे क्रांतिकारक नव-सिद्धान्त मांडले गेले ते सूर्यांतील प्रकाशकिरणांच्या बाबत आमच्या अनुमानसिद्ध तर्काला कळलेले होते असें कोणी वेदांतर्गत 'रुद्र'-मंत्रांच्या नवीन मीमांसेनें ध्वनित करूं लागला तर तें सुतराम् अतिव्याप्तीचें बोलणें आहे असें न मानावें तर काय करावें ? निदान तत्कालीन शास्त्रीय प्रगतीच्या पुराव्यावांचून ते गृहीत धरतां येणार नाहींत एवढें तरी निश्चित.

अशा विचारसरणीला कारण हें आहे कीं, अजून आपण शास्त्रविचारांतहि तटस्थ, निर्विकार व तुलनात्मक अशी दृष्टि वापरीत नाहीं. आमच्या पूर्वजांनीं अणुविषयक कल्पना मांडल्या, म्हणून त्यांनीं प्रत्येक अणूचें रासायनिक संख्यामूल्य ठरविलें होतें व त्यापुढची जी पायरी अणुविषयक भौतिकशास्त्रानें गांठली आहे ती म्हणजे अणुभेद करून त्यांतील वीजक–मध्यगर्भादि रचनेची सृष्टि त्यांनीं जाणली होती असें का सिद्ध होईल ? परंतु प्राचीन संस्कृतीच्या अभिनिवेशाच्या भरांत आम्ही अशीं हास्यास्पद विधानेंही करीत असतों. आणि हीच गोष्ट मानसशास्त्रविषयक लिखाणांतहि दिसून येते. आज आहे त्या प्रगत स्वरूपांतहि मानसशास्त्र हें शास्त्रपद्धतीला सर्वस्वीं लायक मानलें जात नाहीं. असें असतांना आज मानवी मनाची प्रयोगनिष्ठ मीमांसा लावण्याचे जे प्रयत्न 'कन्डिशन्ड रिफ्लेक्सेस'च्या बाबतींत शरीरशास्त्राच्या अनुषंगानें चालले आहेत किंवा 'अंतर्मना'बाबत रोगविज्ञानाच्या दृष्टीनें








चालले आहेत ते आमच्या पूर्वजांनीं केले होते असें कसें सिद्ध होईल ? परंतु 'भारतीय मानसशास्त्र' या नांवाखालीं असा दावा केला जात आहे कीं, जणुं कांहीं तें भारतीय 'पुराण' मानसशास्त्र आधुनिक मनोविज्ञानाशीं मुकाबला करूं शकेल असें होतें ! प्राचीन हिंदूंच्या राज्यशास्त्रविषयक मतांचा विचार आज करूं जातां त्यांत त्यांच्या आत्मज्ञानविषयक समतेच्या कल्पना मिसळल्या जातात आणि मग असें भासविण्याचा प्रयत्न होतो कीं जणुं कांहीं हा 'समता'वाद आजच्या समाजवादाची किंवा साम्यवादाची प्राचीन प्रतिमा होय ! साध्या भांडवली लोकशाहींत 'सामाजिक न्यायदृष्टी' (Social Justice)-ची कल्पना ज्या पूर्व-समाजांतील व्यवहारांत दिसून येत नाहीं तेथें मार्क्सचा आधुनिक आर्थिक दृष्टिकोण माहीत होता असें मानणें बुद्धीला पटण्यासारखें नाहीं. आणि प्राचीन श्रेष्ठ आदर्शवादाची एकीकडे टिमकी वाजवीत असणारा हिंदु, 'कृण्वन्तो विश्वमार्यम्' म्हणजे त्या काळच्या आर्यांची लष्करी ललकारी असें मानून त्या आर्यांना आजच्यासारखींच अजस्र मारक शस्त्रें माहीत होतीं असें म्हणत अभिमान बाळगतांनाहि दिसतो ! कारण त्या काळींहि वायवस्त्र, अग्न्यस्त्र, पर्जन्यास्त्र होतेंच ! जणुं डायनामाइट, व्ही २, अणुगोल वगैरे आधुनिक हिंसक शस्त्रास्त्रें तत्कालीन भारतीय शस्त्रांचीच प्रतिकृति होय ! नुसतें 'विमान' या शब्दाचे उल्लेख जुन्या ग्रंथांत आल्याबरोबर आम्ही हुरळलों आणि आजचें झेपेलिन विमान किंवा यांत्रिक विमान यांची भिन्नभिन्न व समग्र माहिती लक्षांत न घेतांच म्हणूं लागलों कीं आम्ही त्या काळीं हिट्लरएवढेच 'ब्लिट्झ्क्रीग'-वादी होतों ! शाल्वानें विमानें घेऊन द्वारकेवर स्वारी केली होती ना ? व रावण 'पुष्पकां'तून फिरत होता ना ? पण गंमत अशी कीं हा शाल्व आणि तो रावण अशा या आर्यविरोधी लोकांजवळ तीं 'विमानें' होतीं; आर्यवीर कृष्णाजवळ किंवा रामाजवळ नव्हतीं. त्या सुसंस्कृत आर्यांजवळचीं वाहनें म्हणजे गरुडासारखीं पांखरें होतीं.

## शब्दप्रामाण्यवाद व इतिहासदृष्टीचा अभाव

वर दिग्दर्शित केलेली हंसूं येण्यासारखी अवस्था असण्याचीं कारणें म्हणजे आपल्यांतील शब्दप्रामाण्यवाद आणि तौलनिक इतिहासदृष्टीचा अभाव हीं होत. जुन्या ग्रंथांचें संशोधन करून त्यांत नमूद झालेल्या गोष्टींचा संग्रह आवश्यक होय. परंतु एखादी गोष्ट घडली असें लिहिलें गेलें म्हणून ती प्रत्यक्ष घडलीच असली पाहिजे असें सिद्ध होत नाहीं. कारण आपल्याकडील ग्रंथ हे प्रामुख्यानें काव्यग्रंथ आहेत. वेद असोत वा पुराणें असोत, ते ग्रंथ कल्पनेच्या वातावरणांत लिहिले गेले होते हें समजून मग आपण त्यांत लिहिलेल्या गोष्टी गृहीत धरल्या पाहिजेत. शब्दप्रामाण्यवाद व प्रत्यक्ष इतिहासदृष्टि यांतील हा फरक एका उदाहरणानें स्पष्ट करून दाखवितां येईल. विमानांबाबत आपली जशी समजूत आहे तशीच ती पश्चिमेकडेहि होती. परंतु मध्ययुगांतील एका अष्टपैलू प्रतिभावंत माणसानें पक्ष्याप्रमाणें उडतां यावें यासाठीं प्रयोग चालविले होते याची माहिती त्याच्या टिप्पणांसह प्रसिद्ध झाली तेव्हांच ती ग्राह्य मानतां आली. लिओनार्डो द विन्सी हा गृहस्थ आतांपर्यंत प्राचीन इटलींतील प्रतिभाशाली चित्रकार व मूर्तिकार म्हणून माहीत होता. पण त्या चित्रकारानें शरीररचनाशास्त्रांतील विच्छेदनविषयक प्रयोग स्मशानांतून रात्रीं-बेरात्रीं चालविले होते व त्यानेंच गतीचीं प्रमाणें साधून, पक्ष्यांच्या हालचालीचें निरीक्षण करून लांकडी पंख तयार केले होते व म्हणून आज आपण त्याला 'मॅन बुइथ दि विंग्ज्' असें म्हणूं शकतों. आणि हीं सर्व टांचणें त्यानें एका विचित्र लिपींत उलट्या बाजूनें लिहून ठेवलीं होतीं. ती आरशापुढें अचानक धरलीं गेलीं असतां संशोधकाला वाचतां आलीं व आपणाला त्या प्रयोगाचा प्रत्यक्ष प्रमाणभूत पुरावा उपलब्ध झाला. अशा तऱ्हेचा प्रत्यक्ष पुरावा आपल्या देशांतील उत्खननांमधून मिळाल्यास पूर्वींच्या काळीं उडण्याचे प्रयत्न माणसानें हिंदुस्तानांतहि केले होते असें सिद्ध होईल. केवळ 'विमान' या पौराणिक काल्पनिक गोष्टीनें नव्हे. तौलनिक इतिहासदृष्टीचा अभावहि असाच उदाहरणानें समजावून देतां येईल. आजच्या स्वत्वाच्या जाणिवेच्या काळांत 'भारतीय








तर्कशास्त्र ', ' हिंदूंचें अर्थशास्त्र ', ' आर्यांच्या रसायन शास्त्राच्या इतिहास ', ' भारतीय ज्योतिषशास्त्राचा इतिहास '—अशा प्रकारची ग्रंथशीर्षकें भ्रमोत्पादक झालीं आहेत. हे सर्व ग्रंथ प्राचीन आर्यांच्या ज्ञानविषयक माहितीविषयीं असतात. हजार वर्षे अंधारयुगांत चांचपडणाऱ्या भारतानें शास्त्रांबाबत कोणते दिग्विजय गाजविलेले असणार ? बोस, रे, साहा, रामन् यांनीं जे पराक्रम केले आहेत ते पाश्चात्य जगाच्या ज्ञानाच्या आधारावरच होत. असें असल्यामुळें जेथें वरील-सारखे मथळे दिले जातात तेथें ' प्राचीन ' हें विशेषण अध्याहृत असतें. पण आपण सामान्य लोक तें समजून घेत नाहीं. शास्त्र हें शास्त्र पदवीला पोंचलें म्हणजे तें जागतिक होतें, केवळ एकदेशीय राहत नाहीं. तर्कशास्त्र, अर्थशास्त्र, रसायनशास्त्र हीं शास्त्रें आंतरराष्ट्रीय आहेत. भारताचें म्हणून कांहीं वेगळेंच तर्कशास्त्र असणार नाहीं. तसें असेल तर राधाकृष्णन्-सारख्या भारतीय पंडिताचा युक्तिवाद कोणा स्वतंत्र पाश्चात्य युक्तिवादाला सरावलेल्या युरोपीय पंडितांना कळणार नाहीं ! आमचें अर्थशास्त्र स्वतंत्रच —म्हणजे इतर देशांना माहीत नसलेलें—असेल तर आम्हांला आंतरराष्ट्रीय व्यवहार करतां येणार नाहींत. आमचें रसायनशास्त्र हिंदुस्थानपुरतेंच मर्यादित असेल तर सर प्रफुल्लचंद्र रे यांच्या कार्याला व ग्रंथाला जागतिक मान्यता मिळणार नाहीं. आणि आमच्या-कडील निरीक्षकांना दिसलेलें आकाश कांहीं अनन्य-साधारण असेल तर कै. दीक्षितांचा ग्रंथ कुणाला आज कळणारहि नाहीं ! खरी गोष्ट अशी आहे कीं, मानवी प्रगतीच्या एका विशिष्ट टप्प्याच्या वेळीं भारतांतील गंगातटीय संस्कृति व सुधारणा भरभराट-लेली होती. त्या काळीं जीं साधनें उपलब्ध होतीं त्यांचा उपयोग करून प्राचीन भारतीयांनीं आपला ज्ञान-कोश समृद्ध केला. त्या ज्ञानाची कक्षा व विविधता कळण्यासाठीं तत्कालीन मिसर, अरब, ग्रीक, रोम वगैरे ठिकाणच्या संस्कृतींचा अभ्यास करावा लागेल व त्या ठिकाणीं याबाबत कोणते शोध लागले होते तें विचारांत घेऊन मग आपलें श्रेष्ठ-कनिष्ठ स्थान निश्चित करावें लागेल. व तें स्थान ऐतिहासिक महत्त्वाचेंच मात्र असेल. प्राचीन ग्रीकांच्या ' सिलॉजिझम् 'ची तुलना आपल्या जुन्या ' न्याय 'विषयक युक्तिवादाशीं करतां येईल. जुन्या रोमन वारसाविषयक कायद्यांचा व राज्यव्यवस्थेचा अभ्यास करूनच आपणाला ' हिंदू 'च्या आर्थिक कायद्यांचें व राज्यव्यवस्थेंतील अर्थशास्त्राचें प्रगति-मान् आकलन करतां येईल. अरबांचे किमयेचे प्रयोग लक्षांत घेऊन आपण आपल्या पुरातन धातुरसायना-ची कल्पना तरतमभवानें करूं शकूं. आणि मिसरमधील पिरॅमिडांवरून किंवा बाबीलोनमधील एखाद्या मनोऱ्यावरून पाहिलेल्या आकाशविभागां-तील खगोलांची माहिती ध्यानीं घेऊनच आपले वराहमिहिर किंवा भास्कराचार्य यांच्या कार्याची तुलना होऊं शकेल. पश्चिमेकडील जगानें अंधारांतील काळ लौकर संपवून प्रकाशांत प्रवेश केला. त्यांची ज्ञान-परंपरा अबाधित राहिली. पूर्वेकडील आर्यांनीं अंधारयुगाचा काळ फार लांबविला. तेथें आतां कोठें उजाडत आहे. त्यांच्या परंपरा तुटलेल्या आहेत. कित्येक तर स्मरणांतूनहि गेलेल्या आहेत. केवळ पुराणवस्तुसंशोधनानेंच त्यांचें पुरातन अस्तित्व कळून येत आहे. अशा वेळीं कसलीं आलीं आहेत स्वतंत्र ' भारतीय ', ' हिंदू ' किंवा ' आर्य ' शास्त्रें ! आपण संशोधनानें माहिती अवश्य उजेडांत आणावी. आपली परंपरा कोठपर्यंत जिवंत होती त्याचा प्रमाणसिद्ध कयास बांधावा. पण त्या त्या शास्त्रा-विषयीं किंवा ज्ञानशाखेविषयीं लिहितांना आपली ही परंपरा प्राचीन काळची होय हें विसरतां कामा नये.

### पाश्चात्यांची ऐतिहासिक दृष्टि

आपण शास्त्रांचे किंवा कलांचे इतिहास लिहूं लागलों म्हणजे त्यांत आपल्या परंपरांचा उल्लेख प्रथम येणें अपरिहार्य आहे. पण नंतर मात्र त्यांत आधुनिकता आली ती पाश्चात्य परंपरेचीच आहे हें आपण स्वच्छ नमूद केलें पाहिजे व त्यासाठीं तिकडील परंपराहि ध्यानीं घेतल्या पाहिजेत. कित्येक पाश्चात्य लेखक अशा तऱ्हेचे इतिहास लिहितांना आपल्याकडील प्राचीन शोधांचा विचार तुलनेनें करतांना आढळतात. पण आपल्याकडील साधनां-च्या व माहितीच्या अभावामुळें तें काम इच्छा असूनहि समाधानकारक होत नाहीं. एच्. जी. वेल्स यांनीं आपल्या ' जगाच्या इतिहासाची रूपरेषा '







या ग्रंथांत असा प्रयत्न केलेला आहे. पौरस्त्य राष्ट्रांमधील भूस्तरशास्त्र, पुराणवस्तुशास्त्र, मानववंशशास्त्र यांसंबंधींच्या संशोधनाच्या अभावामुळें प्रागैतिहासिक मानवांचें किंवा नरसदृश वानरांचे अवशेष तेथें आहेत कीं नाहींत हें कसें सांगतां येत नाहीं तें त्यांनीं नमूद केलें आहे. परंतु सध्यां साधनांच्या अभावामुळें तें माहीत झालें नसलें तरी प्राक्–कालीन मानव किंवा वानर-नर(ape-man) येथें नसतीलच, त्यांची वाढ येथें झाली नसलेच असें गृहीत धरतां येत नाहीं, असेंहि त्यांनीं नमूद केलें आहे. ही खरी इतिहासदृष्टि होय. सर विलिमय सेसिल डॅम्पिअर यांनीं आपल्या ' ए शॉर्टर हिस्टरी ऑफ सायन्स ' या पुस्तकांत हिंदी लोकांच्या प्राचीन शोधांचा उल्लेख केला आहे. ज्याला आज चुकीनें ' अरेबिक आंकडे ' असें पाश्चात्य मानतात ते दहापर्यंतचे अंक मूळचे भारतीय असून अरबांनीं ते येथून नेले व त्यांच्या द्वारें युरोपांत प्रसार पावले असें त्यांनीं स्वच्छ लिहिलें आहे. तसाच बौद्धकालीन भिषगाचार्यांचा व त्यांच्या औषधिविषयक संप्रदायाचा उल्लेखहि त्यांनीं केला आहे. सर्वच पाश्चिमात्य लेखक आम्हांला अन्याय करतात असें नाहीं. तसें असून चालणार नाहीं. कारण त्या योगें त्यांच्या तौलनिक दृष्टीमध्यें उणीव राहील व त्यांचें शास्त्रज्ञान सदोष होईल. तें त्यांना खपणार नाहीं.

## आत्मवंचना नको

म्हणूनच आतां स्वतंत्र भारतांतील लोकांनीं आपली पारंपरिक व सांप्रदायिक दृष्टि सोडून शास्त्रीय दृष्टि अंगीं बाणविणें क्रमप्राप्त आहे. परंपरेचें ज्ञान ऐतिहासिक महत्त्वाचें होय. जातीचा संप्रदाय आज चालू असला तरी त्यामागील वंशवाद असिद्ध व प्रमाणरहित म्हणून आज मान्य नसून तो एके काळीं रूढ असलेला काल्पनिक वंशवाद होय हें आपण जाणलें पाहिजे. जगांत अनेक संस्कृती होऊन गेल्या, जीर्ण सुधारणा नामशेष झाल्या. अनेक मानववंशांचें संमिश्रण होऊन ' अर्वाचीन ' मानव बनलेला आहे. नीलरक्तवाद, शुद्धबीजवाद वगैरे कल्पना भ्रमोत्पादक आहेत असें आधुनिक शारीरविज्ञानानें व अनुवंशशास्त्रानें दाखवून दिलें. ' रेस, रीझन ॲन्ड रबिश ' ( वंश, विवेक आणि मूढपणा ' ) या ग्रंथांत प्रो. डाइलबर्ग या आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या अनुवंशशास्त्रज्ञानें वंशविषयक माहितीचा थोडक्यांत गोषवारा दिला असून त्या विषयांत लोक किती वेडगळपणाच्या समजुती बाळगून असतात आणि हिट्लरसारखे हुकूमशहा या वंशशुद्धिवादाचा राक्षसी उपयोग करून जनतेला कसें बनवितात तें मार्मिकपणें दाखवून दिलें आहे. तेव्हां आधुनिक काळांत ' भारतीय ' अमुक व हिंदूंचें तमुक असें म्हणत बसणें फक्त अयोग्यच नव्हे तर तें मूर्खपणाचें ठरणार आहे. भारताच्या आध्यात्मिक परंपरेचा उदोउदो करण्याचेंहि कारण नाहीं. जसा सॉक्रेटिस व जीझस तसा बुद्ध व गांधी हा मानवी ध्येयनिष्ठेचा डोळे दिपविणारा आविष्कार होय. आशियाची भूमि धर्मांची जननी असली तर ती प्राचीन काळीं. कालपर्यंत ती गुलामांची व जीर्णमतवादी लोकांची भूमि होती. भारताच्या विशिष्ट परिस्थितींत महात्माजींचा निःशस्त्र सत्याग्रहवाद राजकीय दृष्ट्या यशस्वी झाला असें मानावें लागलें तरी त्यांची सर्वोदयदृष्टीची अहिंसामय सत्याग्रही वृत्ति भारतानें आत्मसात् केली आहे असें मानतां येत नाहीं. प्रत्यक्ष कृतींत आपण सर्वजण पाश्चात्याएवढेच ऐहिकवादी आहोंत, त्यांच्याहून अधिक आत्मवंचनायुक्त आहोंत. आपण जसे आहोंत तसेंच आपलें निरीक्षण करूं या आणि या स्वतःच्या फसवणुकीला कारण होणाऱ्या आपल्या पुरातन संस्कृति-सुधारणांविषयींच्या कल्पना ऐतिहासिक व शास्त्रीय दृष्टीनें तपासून पाहूं या. स्वतंत्र भारताच्या नागरिकांनीं आपलें भवितव्य शास्त्रशुद्ध अशा भक्कम पायावरच उभारलें पाहिजे.








श्री. वा. मु. लिमये

# मतदारसंघ : एकप्रातिनिधिक कीं अनेकप्रातिनिधिक ?

"An ideal system of representation would impress the voters with its fairness, encourage the selection of able representatives, give expression to all important opinions and at the same time facilitate the formation of a workable Government. Proportional representation has not secured all of these objectives. Indeed, no system of representation will, of itself, secure these ends."—Harold G. Gosnell

'Proportional System of Representation.'

प्रतिनिधित्वपद्धति दोन भिन्न तत्त्वांवर ठरवितात. एक, विविध व्यवसायांना प्रतिनिधित्व देतां येतें, यालाच Functional Representation म्हणतात. दुसरें, प्रादेशिक तत्त्वावर प्रतिनिधित्व देतां येतें. याला Territorial Representation म्हणतात. मतदारसंघ हे एकप्रतिनिधिक (Single-member constituency) असावेत कीं अनेकप्रातिनिधिक (multi-member) असावेत हा मुद्दा प्रादेशिक प्रतिनिधित्व पद्धति अंगीकारिली तरच उद्भवतो.

साधारणतः दोन कारणांसाठीं अनेकप्रतिनिधिक मतदारसंघांचा पुरस्कार करण्यांत येतो. अनेकप्रतिनिधिक मतदारसंघ म्हटला म्हणजे मतदारसंघाचा विस्तार मोठा असणार हें उघड आहे. याचा एक फायदा असा समजला जातो कीं, या पद्धतीमुळें व्यापक विचारसरणीचे लोक निवडून येतात. मोठ्या मतदारसंघाचा पाठिंबा मिळवावयाचा म्हणजे 'राखावीं बहुतांचीं अंतरें' असें करावें लागतें; अनेक हितसंबंध पहावे लागतात. थोड्याच लोकांच्या हितसंबंधांचा विचार करावयाचा, ही जी संकुचित विचारसरणी, तिला येथें फार कमी वाव असतो. उलट पक्षीं, परिचयाचा आणि नित्य संबंधाचा जो फायदा लहान मतदारसंघांतील उमेदवाराला मिळतो तो मिळणेंहि दुरापास्त.

परंतु उमेदवार केवळ आपल्या लायकीवर निवडून येण्याचे दिवस आतां संपले आहेत. आजच्या निवडणुकींतील लढत ही व्यक्तींव्यक्तींतील लढत या स्वरूपाची नसते, तर ती राजकीय पक्षांतील लढत असते. मतदान करतांना मतदार उमेदवारांच्या व्यक्तिमत्त्वाकडे न पहातां, तो कोणत्या पक्षाचा आहे हेंच आज पाहातात. निरनिराळ्या पक्षांच्या निरनिराळ्या विचारसरणी, व स्वतंत्र असे कार्यक्रम असतात. आजच्या मतदारानें दिलेलें मत हें विशिष्ट विचारसरणीला व कार्यक्रमाला दिलेलें पसंतीचें शिक्कामोर्तब या स्वरूपाचें असतें. तेव्हां उमेदवार-व्यक्तीचा खाजगी दृष्टिकोन विशाल कीं संकुचित, हा प्रश्नच आज अप्रस्तुत ठरतो. स्वतंत्र उमेदवार म्हणून उभें रहाणेंहि आज कोणी फारसें पसंत करीत नाहीं.

अनेकप्रातिनिधियुक्त मतदारसंघाच्या बाजूनें मांडला जात असलेला दुसरा मुद्दा म्हणजे या पद्धतीनें प्रमाणशीर प्रतिनिधित्व (Proportional Representation) साधतें व मतदारांचीं मतें वायां जात नाहींत. प्रतिनिधिसंघ जितके मोठे तितके प्रमाणशीर प्रतिनिधित्वाचें साध्य अधिक प्रमाणांत

साधतें व मतें कमी प्रमाणांत फुकट जातात. अर्थात् एकवटून मतदान करण्या-(Cumualtive vote)-ची मुभा मात्र असली पाहिजे. उदाहरणार्थ, आपण असें समजूं या कीं, प्रत्येकीं एक लाख मतदार असलेले असे सहा मतदारसंघ आहेत. ( वस्तुतः असे नसणारच; कारण प्रतिनिधी हे एकूण लोकसंख्येच्या अमुक एका संख्येस एक प्रतिनिधि या तत्त्वावर ठरवलेले असतात. सर्व मतदारसंघांतून मतदान करण्यास पात्र असलेल्या लोकांची सारखीच संख्या असणें कठिण आहे. वयांत आलेल्या माणसांचें प्रमाण किंवा मतदानपात्रतेच्या अटी पुऱ्या करणाऱ्यांचें प्रमाण सर्वत्र सारखें नसतें हा मुद्दा स्पष्ट व्हावा म्हणूनच असें गृहीत धरावयाचें. ) आपण असेंहि समजूं या कीं, सहाहि मतदारसंघांत सर्वांनींच मतें दिलीं व कोणाचींच मतें वाया ( invalid ) गेलीं नाहींत. तसेंच आपण असेंहि समजूं या कीं, प्रत्येक मतदारसंघांत कॉंग्रेस-पक्षाला ५५,००० मतें, समाजवाद्यांना ३०,००० मतें व पुरोगामी पक्षाला १५,००० मतें पडलीं. आतां या सहा मतदारसंघांचा एक मतदारसंघ बनविला कीं, मतदाराची संख्या सहा लक्ष झाली. जितके उमेदवार निवडावयाचे तितकीं मतें प्रत्येक मतदारास आहेत. असें समजूं या कीं, कॉंग्रेसनें सर्व जागांसाठीं उमेदवार उभे केले; समाजवादी पक्षानें तीन उमेदवार उभे केले व पुरोगामी पक्षानें एकच उमेदवार उभा केला. मतदानाचा निकाल असा येईल : ५५,००० मतें मिळविणारे सहा प्रतिनिधी; ६०,००० मतें मिळविणारे तीन प्रतिनिधी. व ९०,००० मतें मिळविणारा एक प्रतिनिधि. म्हणजे पुरोगामी पक्षास १ जागा मिळेल; समाजवाद्यांना ३ जागा मिळतील व कॉंग्रेसपक्षाला २ जागा मिळतील. समजा, कॉंग्रेसनें ३ च उमेदवार उभे केले, तर काय होईल? १ लक्ष १०हजार मतें मिळविणारे तीन प्रतिनिधी, ६०,००० मतें मिळविणारे ३ प्रतिनिधी व ९०,००० मतें मिळविणारा एक प्रातिनिधि असें दृश्य दिसेल. म्हणजे कॉंग्रेसला ३ जागा मिळतील, पुरोगामी पक्षाला १ जागा मिळेल व समाजवाद्यांना २ जागा मिळतील. यावरून आपणांस कांहीं उद्बोधक निष्कर्ष काढतां येतील. कॉंग्रेस पक्षाला सर्व उमेदवार निवडून आणतां यावयाचे नाहींत व अल्पसंख्य राजकीय पक्षांनाहि कांहीं जागा मिळतील. कोणत्याहि पक्षानें योग्य प्रमाणांतच उमेदवार उभे करावे. एखादा उमेदवार जास्त उभा केला कीं निवडणुकीचा रंग बदलेल. मतें फार जपून वांटलीं पाहिजेत. समजा, पुरोगामी पक्षानें २ उमेदवार उभे केले, तर त्याच्या वांटणीला एकहि जागा येणार नाहीं. तेव्हां एक गोष्ट स्पष्ट आहे कीं, ही पद्धत गणितावर बसविलेली किचकट आहे. अगदीं प्रमाणशीर म्हणजे जेवढें लोकमत विशिष्ट बाजूनें, तेवढें प्रतिनिधी विधिमंडळांत असें घडेलच असें म्हणवत नाहीं : एकवटून मतदानानें प्रतिनिधी निवडून येण्याची शक्यता वाटल्यानें बारीकसारीक पक्षहि निवडणूक लढविण्याचा संभव आहे. अनेक पक्ष असलेलें विधिमंडळ बनणें शक्य आहे. एवढेंच नव्हे तर कोणत्याच पक्षाचें बहुमत न बनणेंहि शक्य आहे. संमिश्र मंत्रिमंडळ, म्हणजे दुबळें मंत्रिमंडळ, पत्करणें भाग आहे. मंत्रिमंडळांत वारंवार फरक पडणेंहि शक्य आहे. म्हणजेच कोणताहि निश्चित कार्यक्रम सरकारजवळ असूं शकणार नाहीं. व आंखला तर तो पारहि पडणार नाहीं. सरकारविषयीं शाश्वती नसल्यानें लोकांना लोकशाहीविषयीं प्रेम वाटेनासें होईल.

प्रतिनिधी निवडून देण्याच्या आणखीहि कांहीं पद्धती आहेत. List System म्हणजे पक्षाला मत द्यावयाचें व ज्या प्रमाणांत पक्षाला मतें मिळतील त्या प्रमाणांत विधिमंडळांत जागा वांटावयाच्या. ह्या पद्धतीनेंहि वर वर्णन केलेले धोके कायमच रहातील. Limited Vote म्हणूनहि एक पद्धत आहे. ती पद्धति म्हणजे अशी : समजा, मतदारसंघाला ४ प्रतिनिधी निवडून द्यावयाचे असले तर मतदारानें ३ च मतें द्यावयाचीं. या पद्धतीचा एक फायदा म्हणजे एखादा पक्ष फारच बलिष्ठ असेल व इतर पक्षांना निवडून येण्याची संधीच मिळण्यासारखी नसेल तर, त्या पक्षाच्याहि वांट्याला कांहीं जागा येऊं शकतील. एकंदरीनें पाहतां या सर्व पद्धतींत गणित आहे व गुंतागुंत आहे. आपण दिलेल्या मतांमुळें निश्चित काय घडेल हें सांगतां येत नाहीं. सर्व कांहीं गणिताच्या अधीन आहे.








## मतदारसंघ : एकप्रतिनिधिक कीं अनेकप्रतिनिधि

आपल्या देशांत प्रमाणशीर मतदानपद्धति व त्याला पोषक असे अनेकप्रतिनिधिक मतदारसंघ कां नसावे ह्याला अनेक कारणें देतां येतील. एक तर आपल्या देशांतील बहुसंख्य लोक अडाणी व अशिक्षित आहेत. तेव्हां अगदीं सोपी व सुटसुटीत अशी प्रतिनिधित्वपद्धतीच आपण स्वीकारणें जरूर आहे. अनेकप्रतिनिधिक मतदारसंघ हे स्वाभाविकपणेंच मोठे असणार आणि दळणवळणाची गैरसोय असल्यानें उमेदवाराला प्रचारासाठीं मोठ्या मतदारसंघांत संचार-प्रचार करणें कष्टदायक होईल. आपल्या देशांतील जातीय पक्ष क्षीणबल आहेत व ते नष्ट झाले तरच बरें होईल. परंतु घटनेनुसार त्यांच्यावर बंदीहि घालतां येत नाहीं. अनेकप्रतिनिधिक मतदारसंघानें जातीय पक्षांना जीवदान मिळेल. तसेंच एकवटून मतें देतां येणार असल्यास संख्येनें मोठ्या असलेल्या जाती केवळ आपल्या जमातीचे म्हणून कांहीं प्रतिनिधी निवडून देतील. असें होणें इष्ट नाहीं. आपण पार्लमेंटरी पद्धतीची लोकशाही स्वीकारली आहे; तेव्हां अनेकपक्ष निर्माण झाल्यास या पद्धतीचे योग्य ते फायदे आपणांस मिळूं शकणार नाहींत. शक्य तर द्विपक्षपद्धतीच आपल्या येथें प्रचलित व्हावयास हवी.

इंग्लंड, अमेरिका, फ्रान्स या देशांतून एकप्रतिनिधिक मतदारसंघ आहेत. फ्रान्समध्यें मात्र तेथील विशिष्ट परिस्थितीमुळें विधिमंडळांत अनेक पक्ष आहेत. स्वित्झर्लंडमध्यें अनेकप्रतिनिधिक मतदारसंघ असून पक्षहि पुष्कळ आहेत. पण तेथील मंत्रिमंडळ ( executive ) हें अपरिवर्तनीय ( irremovable) आहे.

एक प्रतिनिधि असलेले मतदारसंघ आपणांला हवेतच. पण साध्या बहुमताच्याच जोरावर प्रतिनिधि निवडून आला पाहिजे. निःसंदिग्ध बहुमता-( Absolute Majority )-ची जरूर लागूं नये. निःसंदिग्ध बहुमत याचा अर्थ एकूण जितकें मतदान झालें असेल त्याच्या निम्म्याहून एक अधिक मत ( $\frac{1}{2}$ N + 1 ) समजा, चार लोक उभे आहेत व मतदान एक लाख झालें असून उमेदवारांना अनुक्रमें ४०,०००, ३०,०००, २०,००० व १०,००० अशीं मतें आहेत. चाळीस हजार मतें मिळालेला उमेदवार निवडून आला पाहिजे. त्याला निवडून येण्यासाठीं ५०००१ ( पन्नास हजार एक ) मतें लागूं नयेत. त्याकरितां पुन्हां परत निवडणूक करणें हें गैरसोयीचें आहे व विकल्पानें मत ( Alternate Vote ) देणें अशिक्षित मतदारांना जड जाईल.

---

## साभार स्वीकार

BOMBAY PROVINCIAL PHYSICAL EDUCATION CONFERENCE. First Session (1949), vol. I. Proceedings. Price Rs.1-8-0. vol. II Papers. Price Rs 3/. B. D. D. chawl, No.10, Delisle Road Bombay 11.

MARRIAGE : Indian Legal Philosophy Series, ( Part I ), by Ram Keshav Ranade. LL. M. Venus Book Stall, Poona 2. pp. 56. (1950), Price Rs. 1-2-0

PATHOLOGY OF MIND ( Part I ) : " Why the Super-state may not materialize ? " Written and Published by N. H. Phadnis, Sangli (1950), pp. 33. Price. Rs. 2

# वीण तूं ....

आतां तुटेल मग तुटेल
अशा आशातंतूंत
भेसूर भडक माझ्या जखमांची
फुलें ओंवून केलेली मालिका
आज मीं तुझ्यासाठीं आणली आहे.
ती गळ्यांत घाल.
उगवतीच्या धोत्र्यावर
अर्ध उमलत्या हंसतमुखी सुषमालालीचे
आणि चंद्रचरख्यावर काल काढलेल्या
अमृततंतूंचे,
आडवे उभे धागे जुळवून
उद्याउद्यांच्या वास्तवतेसाठीं
तूं वीण, आंतरतेजीं वस्त्रें वीण.

माझीं फुलं भेसूर भडक जखमांचीं असलीं
तरी बावरूं नकोस.
आशेच्या तुटणाऱ्या तंतूकडे लक्ष देऊं नकोस
तूं सुरवात कर वस्त्रें विणावयाला.
सुरकुतलेली गवताळ माती
अकोडून अवघडलेल्या झाडाच्या फांद्या
खुळखुळणारी वाढलेलीं रोंपटीं
तुला तेंच सांगत आहेत.
सुरू कर तूं तुझें विणणें.
तुझ्या धोत्र्याच्या लयींत—
नादावलेली गवताळ माती
गुंगून गेलेल्या झाडाच्या फांद्या
एकतानलेलीं लहानगीं रोंपटीं
कांत टाकतील.
नव्हाळीच्या पालवींत डंवरून निघतील.
उजाड तमांत उपभोगलेली
नग्न निर्लज्ज आत्मविवशता
बिळांत जाऊन आत्महत्या करील.
भ्रमपटलें दूर झालेला आदित्य
निळ्याच निळ्या स्फटिकेंतून
प्रकाशूं लागेल.
आणि मग,

जीव धरतील माझे आशातंतू
भरून येतील माझ्या जखमा
अश्विनीकुमारांनीं हात फिरविल्यासारख्या.
लवकर वीण आंतरतेजीं वस्त्रें.
सुषमालालीचा आणि काल काढलेल्या
चंद्रकिरणांच्या धाग्यांचा ढीग
वितळून जाण्याच्या आधीं
विणून काढ तूं वस्त्रें.
वीण, लौकर वीण
तूं
आंतरतेजीं वस्त्रें—

—य. द. भावे

# आज, उद्यां आणि काल

'आज–उद्यां'ची मला न चिंता
विश्वासित मी खुलें हांसतों
नमवित नियती सहजपणानें
एक तृप्तिची शीळ घालतों

आह्वानाचें स्वागत नजरीं
भूक शमवितों अभिमानाची
बेछूटपणीं नवी खेळते
जाणिव मादक यशस्वितेची

कधीं कधीं पण कांहीं मागिल
अवचित येतें मनिं सळसळुनी
वर्तमानिंचा आणि सिकंदर
दान मागतो व्याकुळ होउनि

पुरा दिलासा भविष्यांतला
ठेवी पाउल शून्यावरतीं
क्षणांत सांचें दुःख कोठलें
क्षणांत घनता खालींवरतीं

घटकेला त्या, मी नच माझा
असहाय बळी आठवणींचा
'आज–उद्यां'चा सम्राट् जरी
गुलाम बनतों तुप्या 'काल'चा

—पुरुषोत्तम पाटील



अनुक्रमणिका

# ज्योति

[ राग–तिलककामोद; ताल–धुमाळी ]

हे ज्योति कुठुनि आली
कुठें गेली ॥ धृ. ॥

गारेवरतीं गार झाडतां
चकमक तेथें उठली ।
उठली एका क्षणांत दुसऱ्या
उठुनि लयाला गेली ॥ हे ज्योति–॥

नभ मेघांनीं व्याप्त जाहलें
तेथें बिजली लवली ।
लवली एका क्षणांत दुसऱ्या
लवुनि लयाला गेली ॥ हे ज्योति–॥

अंधारानें गगन लिंपिलें
तेथें उल्का पडली ।
पडली एका क्षणांत दुसऱ्या
पडुनि लयाला गेली ॥ हे ज्योति–॥

ब्रह्मांडाच्या गुहेंत धेंडें
आदित्यांचीं स्फुरलीं ।
स्फुरलीं एका क्षणांत दुसऱ्या
स्फुरुनि लयाला गेलीं ॥ हे ज्योति–॥

भूतें मिळतां पांच एकवट
जीवज्योति शिरली ।
शिरली एका क्षणांत दुसऱ्या
शिरुनि लयाला गेली ॥ हे ज्योति–॥

सत्तेच्या सागरांत खाउनि
आनंदाची उसळी ।
चैतन्यातें कवळुनि जेथें
चैतन्यें हीं बसलीं ॥
हे ज्योति तिथुनि आली । तिथें गेली–॥

—कुवलयानन्द

# अक्षरें

सखे, तुझीं तीं अक्षरें
माझ्या मना भुलवीतीं
विस्मयाच्या अंतराळीं
मज नित्य झुलवीतीं.

गडे, तुझीं तीं अक्षरें
फुलें जाईचीं–जुईचीं,
किती निर्मल, सुंदर,
शोभा मनोवाटिकेची !

सखे, तुझ्या अक्षरांची
पर्णांवरी पखरण,
क्षणभंगुराची कां ती
सुरेखशी आठवण ?

सखे, तुझ्या अक्षरांचे
माझ्या व्यथांना फुंकर,
माझ्या मुखांवरी त्यांची
सुशीतल पांखर

सखे, तुझ्या अक्षरांनीं
देहीं किमया घडते
भावार्थांचे गिरिवर
प्रज्ञा उल्लंघोनि जाते.

सखे, तुझीं मुक्ताक्षरें
विराजतीं जळीं स्थळीं
झुलवीत माझ्या मना
विस्मयाच्या अंतराळीं.

—संजीवनी



अनुक्रमणिका







श्री. बा. रं. सुंठणकर

# महाराष्ट्रीय संस्कृतीचें संशोधन : कांहीं विचार

महाराष्ट्राची संस्कृति हा मोठ्या संशोधनाचा विषय आहे. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासाचें संशोधन अद्यापि व्हावयाचें आहे. महाराष्ट्राची संस्कृति ही संमिश्र स्वरूपाची आहे. अनेक सांस्कृतिक प्रवाहांचें मिश्रण होऊन ती बनली आहे. महाराष्ट्रीय समाजजीवनांत अनेक थर आहेत. त्यांचे तीन मुख्य भाग पाडतां येतात. एक ब्राह्मण आणि तत्सम यांचा पांढरपेशावर्ग. दुसरा, मराठा आणि तत्सम यांचा विस्तृत वर्ग, आणि तिसरा महार आणि तत्सम यांचा. वन्य जातींचाहि समावेश या तिसऱ्या वर्गांत करतां येईल. हे सर्व वर्ग महाराष्ट्रांत प्राचीन काळापासून अस्तित्वांत आहेत असें दिसत नाहीं. इतिहासकाळांत वेळोवेळीं अनेक प्रवाह महाराष्ट्रीय समाज जीवनांत मिळत आले आहेत. त्यांच्या मिलाफानें महाराष्ट्रीय संस्कृतीची घडण बनत आली आहे. महाराष्ट्राच्या इतिहासास इ. स. पू. ७–८ व्या शतकापासून सुरुवात होते. त्या काळापासून आजतागायत ज्या भिन्नभिन्न घडामोडी घडल्या आणि त्यांच्या ज्या क्रिया-प्रतिक्रिया समाजजीवनावर झाल्या त्यांतून महाराष्ट्र-संस्कृतीचें संवर्धन होत आलें आहे. मराठेशाहीच्या इतिहासावर फार भर दिला गेल्यामुळें पूर्वींचा इतिहास दुर्लक्षिला गेला आहे. या मागच्या इतिहासाचें संशोधन फार महत्त्वाचें आहे. त्यामुळें महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासाची रचना करतां येईल, महाराष्ट्राच्या जुन्या इतिहासाचा विविध बाजूंनीं विचार करतां येईल. वंश, धर्म, देवता, शिल्प व इतर कला, प्राचीन अवशेष, नैसर्गिक परिस्थिति, इतिहासकालांत झालेलीं स्थित्यंतरें, परकीयांचीं आक्रमणें, अशा अनेक अंगांचा विचार केल्यास महाराष्ट्र संस्कृतीच्या निर्मितीचा आणि वर्धनाचा उलगडा करतां येणें शक्य आहे. याविषयींची दिशा दाखविणें एवढाच या लेखाचा हेतु आहे.

### भिन्नवंशीयांचा संमिश्र समाज

महाराष्ट्रांत अनेक मानववंशांचें मिश्रण झालेलें दिसून येतें. शास्त्रज्ञांनीं वंशशुद्धीचा सिद्धान्त आज टाकाऊ ठरविला असला आणि वंशावरच संस्कृतीची उच्चनीचता अवलंबून नसते हें खरें असलें, तरी इतिहासकाळांत भिन्नभिन्न वंशसमूहांच्या सांस्कृतिक गुणविशेषांचा परिणाम समाजजीवनावर निश्चितपणें झाला असून त्यामुळें संस्कृतीचा परिपोष झाला आहे, हें ऐतिहासिक सत्य नाकारतां येणार नाहीं. महाराष्ट्राच्या गतेतिहासांत भिन्न वंशांचे प्रवाह येऊन मिळाले आहेत आणि महाराष्ट्राचें जीवन वृद्धिंगत होत आलें आहे. हे निरनिराळे वंशप्रवाह शोधून काढले आणि त्यांच्या गुणविशेषांचा तपास केला तर, महाराष्ट्रीय संस्कृतीच्या बनावाचे भिन्नभिन्न घटक वेगळे दाखवितां येतील आणि त्यांचे बरेवाईट परिणाम ठरवितां येणें शक्य होईल. मूळचा महाराष्ट्र हा गोदावरीच्या कांठीं देवगिरि, पैठण, नाशिक या भागाच्या आसमंतात् वसला होता. बाकीच्या भागांत दंडकारण्य पसरलें होतें. दक्षिण-महाराष्ट्राचा कुंतल प्रदेश प्राचीन काळीं सुद्धां वसलेला असावा असें दिसतें. आजच्या महाराष्ट्राचें स्वरूप हें मुसलमानी अमदानीनंतर येऊं लागलें. मराठेशाहीनें तें पुरें केलें. मुसलमानशाह्या आणि मराठेशाही यांच्या काळांत आजचा महाराष्ट्र बनला. याच काळांत वसाहत वाढत गेली. संत-चळवळीनें पैठणचें केंद्र मागें सारून पंढरपूरचा उठाव केला. त्यानंतर



अनुक्रमणिका







# महाराष्ट्रीय संस्कृतीचें संशोधन : कांहीं विचार

हळूंहळू मध्यमहाराष्ट्राला महत्त्व येत चाललें. इंग्रजी अमदानीपूर्वी आपल्या येथें नागरी संस्कृतीची वाढ झालेली दिसून येत नाहीं. नागरी संस्कृतीला खरी चालना इंग्रजी राजवटींतच मिळाली. पहिल्या महायुद्धानंतर शहरांची वाढ झपाट्यानें होऊं लागली आणि नागरी संस्कृतीचीं केंद्रें जागोजाग निर्माण झालेलीं आहेत. महाराष्ट्राच्या या संस्कृति-मंदिराचा पाया येथील मूळचे रहिवाशी होत. मूळची महाराष्ट्र-संस्कृति ही या आदिवासींची होय. या आदिवासींमध्यें आजच्या वन्य जाती असाव्यात आणि द्राविड गणसमूहहि असावेत. वंशदृष्ट्या आजचा महाराष्ट्र हा शक-द्राविड आहे असें तज्ज्ञांनीं ठरविलें आहे. तेव्हां शक आणि द्राविड या दोघांच्याहि संस्कृतीचा परिणाम झाला असला पाहिजे हें ओघानेंच येतें. त्यांतहि द्राविड हे मूळचे असल्यामुळें त्यांची मूळची संस्कृति हा महाराष्ट्र-संस्कृतीचा पाया म्हणतां येईल. याशिवाय इतरहि वांशिक मिश्रणें झालीं आहेत. नाग, कोळी, आभीर हे वंशहि महाराष्ट्रजीवनांत मिसळून गेले आहेत. वांशिक दृष्ट्या महाराष्ट्र हा मोठ्या प्रमाणांत संमिश्र समाज आहे. इसवी सनाच्या ४ थ्या शतकाच्या सुमारास महाराष्ट्रिकांचा नाग लोकांशीं मिलाफ झाला असा सिद्धान्त इतिहासाचार्य श्री. राजवाडे यांनीं मांडलेला आहेच. या नागलोकांची संस्कृति कोणत्या दर्जाची होती हा संशोधनाचा विषय आहे. नागांच्या संस्कृतीचा परिणाम जसा झाला असला पाहिजे तसाच महाराष्ट्रीय संस्कृतीवर कोळी लोकांच्या संस्कृतीचा बराच परिणाम झाला असावा असें दिसतें. कोळ्यांची स्वतंत्र अशी संस्कृति असून ती बरीच वरच्या दर्जाची होती असें मानण्याला जागा आहे. कोळ्यांचीं दैवतें, उपासना, धर्म, आचार-विचार हीं वेगळीं दिसतात. त्यांच्यांत राज्यकर्ता वर्गहि निर्माण झाला होता. मराठेशाहींतसुद्धां या वर्गाचें अस्तित्व दृग्गोचर होतें. कोळ्यांचे बरेच आचार-विचार महाराष्ट्रीय जीवनांत बद्धमूल झाले असावेत. महाराष्ट्रीय स्त्रियांची वेशभूषा ही कोळ्यांच्या अनुकरणानेंच बनली असावी. महाराष्ट्रीय स्त्रियांत दिसून येणारी सकच्छ नेसण्याची पद्धत ही हिंदुस्थानांतील इतर कोणत्याहि प्रांताहून अगदी वेगळी असून तिचें तंतोतंत साम्य कोळी स्त्रियांच्या पेहरावाशींच आहे गोमांतकासह सर्व कोंकणपट्टींत हीच पद्धति आढळून येते. महाराष्ट्रीय संस्कृतीचा कांहीं भाग कोळी संस्कृतीनें व्यापला आहे असें अनुमान केल्यास तें फारसें चुकीचें होणार नाहीं.

## तुटपुंजी सामग्री

याशिवाय दिसून येणारी वांशिक मिश्रणें म्हणजे आंध्र—वासियांचीं आणि आभीरांचीं होत. आंध्रवासियांचें मिश्रण हें शालिवाहन राजवंशाच्या काळांत झालेलें आहे. शालिवाहन हे मूळचे आंध्रदेशी असून स्वतःला आंध्रभृत्य म्हणवून घेत असत. ते द्राविड असावेत. त्यांचें राज्य प्रस्थापित झाल्यानंतर त्यांच्याबरोबर आंध्रदेशीयांचा मोठा समूह तेथें येऊन स्थायिक झाला असावा. हा समूह कालांतरानें तेथील समाजाशीं मिसळून एकजीव झाला असावा. आज सुद्धां महाराष्ट्रीय लोक आणि आंध्रवासी लोक यांच्या चेहरेपट्टींत आश्चर्य वाटण्याजोगें साम्य दिसून येतें. कोणत्याहि अखिल-भारतीयांच्या मोठ्या मेळाव्यांत बारकाईनें निरीक्षण केल्यास हें साम्य आढळून आल्यावांचून राहात नाहीं. आंध्र वंशाचें मिश्रण जसें निश्चित—पणें सांगतां येतें तसें आभीरांचें मिश्रण ठरविणें कठिण आहे. पण चवथ्या शतकाच्या सुमारास खानदेशच्या प्रदेशांत आभीर कुलाचें राज्य होतें असें इतिहास सांगतो. आभीरांच्या उत्पत्तीचें विवेचन सर भांडारकर यांनीं केलें असून त्यांच्या म्हणण्याप्रमाणें आभीर हे भटक्ये व गोपालनवृत्तीचे लोक मूळचे रोमच्या भागांतील असून परिभ्रमण करीत करीत खिस्ती शकाच्या प्रारंभीं ते हिंदुस्थानांत आले व निरनिराळ्या भागांत पसरले. कांहीं ठिकाणीं त्यांनीं राज्यें संपादन केलीं. मुरली धारण करणारा बलदेव हा मूळचा त्यांचा असून पुढें कालांतरानें हा बलदेव व कृष्ण या देवता एकरूप झाल्या. आभीरांच्या संस्कृतीचाहि परिणाम येथील जीवनावर झाला असून तो कसा आणि किती झाला हें शोधून काढावें लागेल. याशिवाय वन्य जमातींचेंहि संशोधन व्हावयाला पाहिजे. तेथील मूळची संस्कृति आणि धर्म हीं त्यांचींच होतीं. त्यांवर संस्कार होत होत समाजजीवन प्रगत








आणि प्रगल्भ होत गेलें. या जमातींपैकीं भिल्ल हे एके काळीं प्रमुख असावेत असें मानण्याला जागा आहे. कारण त्यांची वेगळी अशी संस्कृति होती. आणि पूर्वी आजच्याइतक्या निकृष्ट अवस्थेंतहि ती नसावी. महारांची संस्कृति हा स्वतंत्र आणि महत्त्वाचा विषय आहे. शतकानुशतकें पददलित अवस्थेंत राहूनहि या जमातीनें आपलें स्वत्व राखलें आहे. जमिनीची मूळची मालकी त्यांची असावी हें त्यांच्या उर्वरित हक्कावरून सिद्ध होतें. येथील ग्रामव्यवस्थेंत त्यांना स्थान होतेंच. त्यांच्या तोंडची मराठी भाषा ही कुणबी शेतकऱ्यापेक्षांहि अस्सल मराठी वळणाची वाटते. बौद्धिक किंवा इतर क्षेत्रांत कोणत्याहि उच्चवर्णीयांच्या जोडीला ही जमात बसूं शकते. तिचें बारकाईनें निरीक्षण केलें, कीं एका काळच्या उच्च संस्कृतीच्या निदर्शक खाणाखुणा दृष्टोत्पत्तीस आल्याशिवाय रहात नाहींत.

महाराष्ट्रीय हे प्रधानतः शक–द्राविड आहेत असें म्हटल्यानंतर शक आणि द्राविड यांचें मिश्रण केव्हां झालें आणि त्यांचें पृथक् अस्तित्व कशा स्वरूपाचें होतें, त्यांचे विशेष कोणते होते आणि त्यांच्या मिश्रणानंतर तयार झालेल्या संस्कृतींत कोणते विशेष उतरले वगैरे अनेक गोष्टींचें संशोधन करावें लागेल. सध्यां हातीं असलेली सामग्री या संशोधनाकरितां अगदींच तुटपुंजी वाटते. शकांचें राज्य कोणत्या काळांत होतें हें अद्यापि निश्चित झालें नाहीं. शकांचा शालिवाहनानें पराभव केला आणि प्रजाजनांची सुटका केली, एवढी माहिती उपलब्ध आहे. शक आणि द्राविड हे महाराष्ट्र-संस्कृतींतील मुख्य प्रवाह आहेत. त्यांचें संशोधन झाल्याशिवाय महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास पुरा होणार नाहीं. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासांत इतरहि कांहीं परकीय गटांचा विचार करणें अवश्य आहे. पारशी, बेनेइस्राएल आणि मध्यपूर्वेकडून आलेले आणि येथेंच स्थायिक झालेले इस्लामधर्मीय, हे घटक वेगवेगळे रहात आले आहेत. महाराष्ट्राच्या समाजजीवनाचा विचार करतांना तो सम्यक् रीतीनें केला पाहिजे. सबंध समाजजीवन आणि त्यांचे भिन्नभिन्न घटक यांचा विचार करणें क्रमप्राप्त आहे. बेने-इस्राएलसारख्या जाती या शेकडों वर्षें येथें राहिल्या असून त्या अलगपणें संसार करीत आल्या आहेत. त्यांचा थोडा ना थोडा परिणाम येथल्या समाजावर कांहीं भागांत तरी झाला असावा, तसेंच येथल्या समाजजीवनाचा चिरपरिणाम त्यांच्यावरहि पण झाला असला पाहिजे. इस्लामचा आपल्यावर झालेला परिणाम हा एक स्वतंत्रच विषय आहे. तुर्की, अरबी, इराणी, वगैरे इस्लामपंथीय इतिहासकाळांत येथें आले. त्यांच्यापैकीं कांहीं राजपदावर होते. तसेंच राजदरबारींहि होते. कांहीं व्यापाराच्या निमित्तानेंहि आले होते. याचा परिणाम जीवनाच्या विविध क्षेत्रांत झाला असल्यास नवल नाहीं. या सर्व घटकांचा सम्यक्पणें विचार करायला आपण शिकलें पाहिजे.

### बहुजनसमाजाचा धर्म

महाराष्ट्रांत दिसणारा हिंदुधर्म एकरूप दिसत असला तरी तो तसा नाहीं. हें विधान केवळ महाराष्ट्रापुरतेंच नव्हे तर, साऱ्या हिंदुस्थानापुरतें करतां येतें. कारण हिंदूंमध्यें धर्मदृष्ट्या अनेक भेद आहेत तरी या सर्व भेदांत सामान्यपणें दोन वर्ग करतां येतात. उच्चवर्णीयांचा धर्म निराळा आणि बहुजनसमाजाचा धर्म निराळा. उच्चवर्णीयांचा हिंदुधर्म महाराष्ट्राच्या इतिहासांत फार उशीरां रूढ झालेला दिसून येतो. ब्राह्मणी धर्म (Brahmanism)-चे संस्कारहि उशीरां झालेले दिसतात. धार्मिक दृष्ट्या महत्त्वाचे असे पहिले संस्कार बुद्ध धर्माचे झाले होते. इतिहासकालांत महाराष्ट्राचें पहिलें उत्थापन बौद्धांनींच केलें आहे. तें श्रेय इतर कोणापेक्षांहि त्यांनाच द्यावें लागतें. धर्मप्रसारार्थ महाराष्ट्रांत बौद्ध भिक्षू आले होते असे उल्लेख सांपडतात. तसेंच या प्रदेशांत अशोकाचे शिलालेखहि उपलब्ध आहेत. महाराष्ट्राच्या खऱ्या इतिहासाला बौद्धांच्या आगमनानेंच सुरुवात होते. शालिवाहनादि राजवंशांचा बौद्धांना आश्रय होता. महाराष्ट्रांतील उच्च दर्जाच्या चित्र व शिल्प या कला बौद्धांनींच निर्माण करून ठेवल्या आहेत. बौद्धांच्या आगमनापूर्वीं येथील समाज हा प्राथमिक अवस्थेंत होता. त्यांचा धर्महि प्रथमावस्थेंतील धर्म होता. प्रतिमापूजन, जादूटोणा, पशुबली वगैरे त्यांच्या धर्माचीं लक्षणें होतीं. त्यांच्या अनेक देवता होत्या. जागोजाग स्थानिक देवता










आणि प्रादेशिक देवता सर्वत्र विखुरलेल्या होत्या. या देवतांचें अस्तित्व आजतागायतहि आहे. खंडोबा, ज्योतिबा वगैरे देवता प्रादेशिक होत. या देवतांभोंवतीं त्या त्या टापूंतील भक्तगण जत्रेच्या निमित्तानें गोळा होत असत. मूळच्या महाराष्ट्रीय लोकांची धार्मिक संघटना अशाच स्वरूपाची असावी. या सर्वांत शिवपूजा ही सामान्यतः सर्वत्र रूढ होती. शिवाच्या जोडीनेंच देवीचीहि उपासना पहिल्यापासून अस्तित्वांत होती. देवीची उपासना ही द्राविडांच्या मातृसत्ताक गणांतून परंपरेनें चालत आली असावी. कालांतरानें कांहीं भागांत देवीलाच शक्तीचें स्वरूप प्राप्त होऊन शाक्तपंथहि प्रचलित झाला असावा. हा इतिहास बराच पुढचा आहे. भवभूतीच्या 'मालती-माधवां'त कापालिक पंथाचा उल्लेख आला आहे. भवभूति हा महाराष्ट्रीय असून ८ व्या शतकाच्या सुमारास होऊन गेला. नाशिक जिल्ह्यांत कापालिकांचें एक देवस्थान अस्तित्वांत आहे. तसेंच शाक्तपंथीयांचें अस्तित्व आजमितीसहि जागोजाग आढळून येतें.

### धार्मिक क्षेत्रांतील क्रियाप्रतिक्रिया

महाराष्ट्रांत ब्राह्मणी धर्माला उठाव ६ व्या शतकानंतर मिळाला. पूर्व चालुक्यांच्या काळापासून उत्तरोत्तर ब्राह्मणी धर्माचें वर्चस्व महाराष्ट्रभूमींत वाढत गेलें. यादवांच्या काळीं त्याचें पूर्ण वर्चस्व होतें. बौद्ध धर्माचा प्रपंच येथें ६-७ शतकें तरी असावा असें वाटतें. बौद्ध धर्माची पीछेहाट झाल्यानंतर ब्राह्मणी धर्माचा शिरकाव झाला. तत्पूर्वी त्या धर्माचा प्रभाव पडल्याच्या खाणाखुणा दिसूत येत नाहींत. बौद्ध धर्म मागें पडला तरी पण ब्राह्मणी धर्माला विरोध करणारी जैन धर्माची शक्ति अस्तित्वांत होतीच. ९ व्या-१० व्या शतकाच्या सुमारास जैनांचें प्राबल्य विशेषतः दक्षिण-महाराष्ट्रांत अधिक होतें. या प्रदेशांत जैन धर्माचीं पीठें ठिकठिकाणीं पसरलीं होतीं. आजहि तीं अस्तित्वांत आहेत. जैन धर्माला अनेक राजांचा आश्रय मिळालेला होता. १२ व्या शतकाच्या सुमारास जैन धर्म मागें पडलेला दिसतो. त्या धर्माला विरोध करणाऱ्या अनेक शक्ती नव्यानें निर्माण होत होत्या. जैनांना ब्राह्मणी धर्माचा विरोध प्रारंभापासूनच होता. त्याच्या जोडीला शैव आणि वैष्णव ( भागवत ) पंथ जैनांना विरोध करण्यास सरसावले. या शैव-वैष्णवांनीं जैनांबरोबर ब्राह्मणी धर्मालाहि विरोध करण्यास सुरुवात केली. कर्नाटकांत शैवांची संघटना बसवाच्या वीरशैव संप्रदायांत झाली. महाराष्ट्रांत त्याच सुमारास नाथ पंथानें आपलें प्रस्थान ठेवलें. नाथपंथ हिंदुस्थानांत एक प्रभावी पंथ होऊन गेला आहे. त्या पंथाविषयीं अधिक संशोधन होणें अवश्य आहे. अवैदिकांना मागें सारणें आणि पुढच्या भक्तिसंप्रदायाची पार्श्वभूमि तयार करणें हीं दोन कार्यें नाथपंथीयांनीं केलीं आहेत.

१२ व्या शतकानंतर महाराष्ट्रांत भक्तिमार्गाला जोरानें चालना मिळत गेली. त्यानंतर निघालेले सर्व महत्त्वाचे संप्रदाय भक्तिमार्गीच होते. त्यांत महानुभावांचा पंथ हा पहिला होता. त्यानंतर संतांचा भागवतसंप्रदाय नांवारूपाला येऊन साऱ्या महाराष्ट्र देशभर पसरत चालला होता. अनेक शतकें त्याचा प्रभाव पडत होता. महाराष्ट्राच्या इतिहासांत धार्मिक क्षेत्रांत अनेक क्रिया-प्रतिक्रिया सतत घडत असलेल्या दिसून येतात. अनेक पंथ एकाच वेळीं वेगवेगळे प्रपंच करीत होते. त्यांपैकीं कांहींमध्यें विरोधहि होता. या पंथांचीं केंद्रें निरनिराळ्या ठिकाणीं स्थापन झालीं होतीं. संतसंप्रदायाच्या स्थापनेनंतर त्याला प्रतिक्रियात्मक असा गुरुचरित्राचा संप्रदाय निघाला. तसेंच गाणपत्य वगैरे इतरहि संप्रदाय स्थापन झाले होतेच. रामदासी संप्रदाय हा १७ व्या शतकांत स्थापन झाला. हे सर्व पंथ एकाच वेळीं आपला संसार चालवीत होते. या सर्व पंथांचा मिळून एक संमिश्र असा धर्म महाराष्ट्रांत वावरत होता. प्रार्थनासमाजाची स्थापना वगैरे घटना अगदीं अलीकडच्या आहेत. भक्तिमार्ग हें जरी आमच्या धर्माचें सामान्य स्वरूप असलें तरी त्यावर ब्राह्मणी धर्माचा प्रभावहि बराच पडला आहे. आमचा धर्म कर्मकांड आणि भक्तिमार्ग यांच्या मिश्रणानें बनला आहे. सामान्य जनसमूहांत प्राथमिक धर्माचे अवशेष अधिक आहेत. प्रादेशिक देवतांच्या जत्रा आजहि मोठ्या प्रमाणावर भरत असतात. आमच्या समाजांत धर्मप्रवणता बद्धमूल झालेली दिसते. उच्चवर्णीय लोक सुधारणेच्या कितीहि गोष्टी

बोलले तरी आंतून ते धर्मनिष्ठच आहेत. समाजांतील विविध थरांच्या धर्मनिष्ठांचे उगम इतिहासांत शोधतां येतात. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासाचा विचार करतांना येथील समाजजीवनावर विविध धर्मपंथांच्या क्रियाप्रतिक्रिया कसकशा घडत आल्या आहेत याचा साकल्यानें विचार करणें अवश्य आहे.

## शिल्प व इतर कला

संस्कृतिसंशोधनाचें तिसरें क्षेत्र म्हणजे शिल्प व इतर कला होत. वेरूळ-अजिंठ्यापासून बादामीपर्यंतच्या प्रदेशांत जीं लेणीं इतस्ततः पसरलेलीं आहेत त्यांचा ऐतिहासिक व सामाजिक दृष्ट्या बारकाईनें अभ्यास व्हावयाचाच आहे. कलेच्या दृष्टीनें कौतुकानें आजपर्यंत आपण त्यांच्याकडे पाहत आलों. सांस्कृतिक आणि सामाजिक दृष्ट्या त्यांचा विचार होणें जरूरीचें आहे. या लेण्यांपैकीं बरींच लेणीं ही बौद्धांची महाराष्ट्राला मिळालेली मौल्यवान् देणगी होय. वेरूळचीं लेणीं आणि अजिंठ्याची चित्रकला हीं निःसंशय उच्च संस्कृतीचीं द्योतक आहेत. तेथील लेण्यांच्या आणि चित्रांच्या साहाय्यानें तत्कालीन समाजजीवनांवर, आचारविचारांवर, वेषभूषा, राहणी, धर्मकल्पना वगैरे अनेक गोष्टींवर प्रकाश टाकतां येईल. या कार्याकरितां संशोधक निघाले पाहिजेत. शिल्पादिकलांच्या साहाय्यानें महाराष्ट्राच्या सगतवार सांस्कृतिक इतिहासाचा सांगाडा रचतां येणें अगदीं शक्य आहे. प्राचीन कलेचें अत्युत्कृष्ट स्वरूप महाराष्ट्रांत सांपडतें. शिल्पकलेचा पाया बौद्धांनीं घातला. त्यांचा वारसा पुढें इतरांनींहि चालविला. बुद्धकालीन लेणीं जशीं सांपडतात तशीच ब्राह्मणधर्मीयांचींहि लेणीं सांपडतात. जैनांनींहि शिल्पकलेला बराच हातभार लावलेला आहे. त्याशिवाय पुढच्या काळांत चालुक्य, शिलाहार, आणि हेमाडपंती शिल्पाचे नमुनेहि सांपडतात. मुसलमान राजवटीनेंहि भव्य शिल्प निर्माण करून ठेवलें आहे. मराठेशाहींत शिल्पादिकलांची वाढ झालेली दिसून येत नाहीं. पूर्वीच्या शिल्पाच्या मानानें मराठेशाहींतील शिल्प हें अगदीं निकृष्ट दर्जाचें वाटतें. कला या संस्कृतीच्या निदर्शक असतात. म्हणून कलांच्या साहाय्यानें संस्कृतीचें मोजमाप ठरवितां येतें. या कलांचे अवशेष महाराष्ट्रांत जेथें जेथें आहेत तेथें येथें त्यांची कसून तपासणी झाली तर, त्या त्या काळांतील संस्कृतीच्या सामान्य रूपरेषा ओळखण्यास निश्चितपणें साहाय्य होईल.

## भाषा व वाङ्मय

भाषा आणि वाङ्मय हीं संस्कृतीचीं महत्त्वाचीं अंगें असतात. या दृष्टीनें महाराष्ट्राच्या भाषा, बोली आणि वाङ्मय यांचा अभ्यास उद्बोधक ठरेल. प्राचीन काळचें वाङ्मय फारच थोडें उपलब्ध आहे. पण आहे त्या तुटपुंज्या साधनसामग्रीचा उपयोग करून घेतला पाहिजे. प्राचीन काळचा विचार करतांना बौद्धांच्या पालीभाषेकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं. पाली भाषेचा तत्कालीन भाषेवर कांहीं ना कांहीं परिणाम झाला असला पाहिजे आणि तो परिणाम अवशेषाच्या रूपानें मराठी भाषेंत उतरला असला पाहिजे. "मराठीच्या धमन्यांतून पाली भाषेचें रक्त खेळत आहे" हें कै. भिडे यांचें विधान असत्य मानतां येणार नाहीं. महाराष्ट्रीय वाङ्मयापैकीं हालाची 'सप्तशती' ही महत्त्वाची आहे. त्यावरून तत्कालीन समाजजीवनाचा परिचय होण्याला निःसंशय मोठी मदत होईल. हा ग्रंथ लोकगीतांच्या स्वरूपाचा असल्यामुळें लोकजीवनाचें प्रतिबिंब त्यांत उमटलें आहे. 'सप्तशती'प्रमाणेंच भवभूतीच्या वाङ्मयाचीहि तपासणी करावी लागेल. हें वाङ्मयहि कांहीं बाबतींत महाराष्ट्रीय संस्कृतीवर प्रकाश टाकूं शकेल. यापेक्षांहि सांस्कृतिक दृष्ट्या लोकगीतांचा अभ्यास हा अधिक उपयुक्त ठरेल. लोकवाङ्मयाचा आपण हिरिरीनें पुरस्कार करतों. पण जुन्या लोकगीतांत आढळणाऱ्या लोकवाङ्मयाकडे आपण दुर्लक्षच करीत आलों आहोंत. निरनिराळ्या भागांतील लोकगीतांचा संग्रह केला तर त्यावरून सामाजिक चालीरीती, आचारविचार, परंपरा व त्यांचे उगम वगैरे अनेक गोष्टींची माहिती मिळवितां येईल. लोकगीतें हीं सामान्य जनांच्या संस्कृतीचीं गमकें असतात. त्यावरून संस्कृतीचा दर्जा पारखतां येतो. प्राचीन वाङ्मयावरून संस्कृतिसंशोधनाचा प्रयत्न म्हणून डॉ. केतकरांच्या 'प्राचीन महाराष्ट्र'चा उल्लेख करणें अवश्य आहे. 'कथासरित्सागरा'च्या साहाय्यानें हें संशोधन कसें करतां येतें याचा मार्ग












त्यांनीं दाखवून दिला आहे. संशोधकांना तो खास उपयुक्त वाटेल.

जुनें मराठी वाङ्मय आतां खूपच उपलब्ध झालें आहे. त्याचें सामाजिक, सांस्कृतिक वगैरे विविध बाजूंनीं समीक्षण अद्याप फारसें झालें नाहीं तें झालें पाहिजे. विविध पंथांच्या वाङ्मयाचाहि त्याच दृष्टीनें अभ्यास झाला पाहिजे. जैनांचें धार्मिक मराठी वाङ्मय बरेंच आहे. त्याकडेहि लक्ष पुरविणें अवश्य आहे. कोंकणी बोलींचें एक स्वतंत्र दालनच आहे. दमणपासून कारवारपर्यंत या बोली पसरल्या आहेत. या बोलींच्या अभ्यासाच्या साहाय्यानें कांहीं गोष्टींचा उलगडा होईल. या बोली इतिहासकाळांत मराठीशीं एकरूप असाव्यात; किंवा एकाच मूळच्या भाषेच्या भिन्न शाखा असाव्यात. ज्ञानेश्वरींतसुद्धां कोंकणी भाषेंतील शब्द आणि प्रचार सांपडतात. तसेंच कानडी भाषेचाहि परिणाम मराठी भाषेवर झाला आहे. त्याचाहि विचार करावा लागेल.

निरनिराळ्या समाजसंस्था याहि संस्कृतीच्या घटक असतात. संस्कृतीच्या घडणीमध्यें त्यांना महत्त्वाचें स्थान असतें. विवाहसंस्था, कुटुंबसंस्था, न्याय-संस्था, पंचायतसंस्था, जातिसंस्था अशा विविध संस्थांच्या द्वारें समाजाचें नियमन होत आलें आहे. या संस्थांच्या द्वारें संस्कृतीचा संसार चालत असतो. जुन्या काळांतील या संस्थांचें संशोधन करण्याकडे आपण आजपर्यंत द्यावें तितकें लक्ष दिलें नाहीं. असें संशोधन झालें तर, महाराष्ट्रसंस्कृतीचें चित्र साकल्यानें उभें करण्याला तें सहायभूत होईल. विशेषतः जातिसंस्थेचा अभ्यास सूक्ष्म आणि विस्तारानें व्हावयास हवा. जातिसंस्था हा समाजाचा पाया होता. ग्रामसंस्था हें या पायावरचें मंदिर होतें. या संस्थांनींच समाजाचें स्वरूप निश्चित झालें होतें.

### भौतिक परिस्थितीचा परिणाम

महाराष्ट्र-संस्कृतीचा आणखी एका दृष्टीनें विचार होणें अवश्य आहे. येथील संस्कृतीच्या निर्मिती-मध्यें भौगोलिक परिस्थितीचा बराच मोठा भाग आहे. अन्न, जमीन, नैसर्गिक परिस्थिति यांच्या इतिहासावर होणाऱ्या परिणामाकडे लक्ष वेधण्याचें श्रेय प्रामुख्यानें बकल या इतिहासवाद्याला दिलें पाहिजे. बकलच्या सिद्धान्तांतील सत्य महाराष्ट्रीय इतिहासाला लावून पारखून घेतलें पाहिजे. महाराष्ट्राची खडकाळ आणि उंचसखल जमीन, पाण्याचा अपुरा पुरवठा यांमुळें बनलेली शेती आणि त्या शेतीवर काबाड-कष्ट करणारा शेतकरी हें सर्व विचारांत घेतलें पाहिजे. येथील विशिष्ट परिस्थितीमुळें एकंदर उत्पादनपद्धति निश्चित झाली. या उत्पादनपद्धती-मुळें येथील विशिष्ट समाजजीवन तयार झालें. लोकांची मानसिक अवस्था आणि समाजविशेष विशिष्ट धर्तीचे बनले. त्यांचा इतिहासावर परिणाम झाला. उदाहरण द्यावयाचें झालें तर गतकालांत दिसून येणाऱ्या मराठ्यांच्या आक्रमक आणि युयुत्सु वृत्तीचें मूळ येथील कृषिजीवनाच्या परिस्थितींत शोधतां येईल. येथील शेती पिकवून समृद्ध करण्यास अधिक परिश्रम करावे लागतात. येथील शेती कष्टसाध्य आहे. तेव्हां साहजिकच या परिश्रमांच्या ऐवजीं सैन्यांत दाखल होऊन बाहेरून संपत्ति लुटून आणण्याचा सोपा मार्ग हातीं येतांक्षणींच शेतकरी-वर्ग रणांगणाकडे वळणें साहजिकच होतें. मराठ्यांच्या लढाऊ वृत्तीची भौतिक उपपत्ति अशी लावतां येईल. युद्धाकडे अधिक लक्ष गेल्यामुळें बौद्धिक व इतर क्षेत्रांत मराठ्यांचें दुर्लक्ष झालें. उत्तर मराठे-शाहींत मराठ्यांची जी पीछेहाट झाली त्याचें हेंहि एक कारण आहे असें म्हणतां येईल.

महाराष्ट्राचें कृषिजीवन हें समृद्ध आणि संपन्न नसल्यामुळें व्यापार वाढूं शकला नाहीं. महाराष्ट्रानें प्रादेशिक आक्रमणें केलीं. याच्या उलट मुसलमान, मारवाडी, गुजर, वगैरे बाहेरच्या लोकांनीं महाराष्ट्रावर व्यापारी आक्रमणें केलीं. व्यापार वाढूं न शकल्यामुळें येथलें जीवन बरेचसें खुरटलेलें झालें. अशा अनेक दृष्टींनीं महाराष्ट्रसंस्कृतीचा विचार करतां येईल. पाश्चात्य पंडितांनीं इतिहासवादाचे जे निरनिराळे सिद्धान्त मांडले आहेत त्यांपैकीं आपणाला जे जे लागूं पडतील त्यांचा उपयोग करून घेणें आवश्यक आहे.

अशा अनेक साधनांचा उपयोग करून महाराष्ट्राच्या इतिहासाची पुनर्रचना करतां येईल. आजपर्यंत झालेल्या संशोधनाचा योग्य उपयोग करून नव्या संशोधनाची त्यांत भर घातली तर, या पुन-

[ पुढील मजकूर पान ६० वर पहा ]

स्टीफन झ्वाइग : अनु. श्री. स. शं. देसाई

# वी रो चि त क्ष ण

मध्यरात्र[1] उलटून गेली होती. तो निद्राधीन असतांना ते त्याला नेण्याकरितां आले. कोठडी-बाहेर संगिनींचा आवाज झाला. तो हुकुमाचा आवाज होता. त्या घनदाट काळोखांत ते मृत्यूच्या छायेसारखे भासत होते. त्यांनीं त्याला बाहेर खेंचलें आणि सज्जांत आणलें. तो विस्तीर्ण सज्जा काळोखांत पार बुडून गेला होता. कुलुपांत किल्लीचा आवाज झाला आणि तुरुंगाचीं दारें उघडलीं गेलीं.

त्याला प्रथमच आकाशाचें दर्शन झालें, आणि पहांटेचा गार वारा त्याच्या अंगाला झोंबला. बाहेर एक गाडी उभी होती. जणूं कांहीं फिरती समाधीच ! त्यांनीं त्याला त्या गाडीमध्यें ढकललें आणि गाडी चालूं झाली.

त्याच्या शेजारीं हातांपायांना बेड्या असलेले पांढऱ्या फटफटीत चेहऱ्याचे नऊ सोबती होते. त्यांचीं तोंडें बंद होतीं. कोणीहि बोलत नव्हता. ती गाडी कोठें जात होती तें प्रत्येकाला माहीत होतें. गाडीचीं चाकें फिरत होती आणि रस्त्याबरोबरच त्यांचें आयुष्य मागें जात होतें.

गाडी थांबली. ती फिरती समाधि उभी राहिली. एक दरवाजा कर्रर वाजला. त्यांनीं गाडीच्या खिडकींतून बाहेर पाहिलें. त्यांच्यासमोर घरांचा एक अजस्र ठोकळा उभा होता. तो ठोकळा काळवंडून गेलेला आणि संत्रस्त दिसत होता. एखाद्या निद्राभंग झालेल्या मनुष्याप्रमाणें तो त्यांच्या-कडे झोंपाळू नजरेनं पाहत होता.

घरांचीं छपरें बैठीं होतीं. आणि तीं घाणेरड्या बर्फानें आच्छादून गेलीं होतीं. चौकांमध्यें सगळी-कडे बर्फ आणि काळोख, काळोख आणि बर्फ होतें.

फांशीच्या जागीं राखी रंगाची हिमवृष्टि होत होती. फक्त चर्चभोंवतीं पहांट एखाद्या

---

१ सुप्रसिद्ध लेखक स्टीफन झ्वाइग याचा 'मानवतेंतील मोठे क्षण' या नांवाचा सुप्रसिद्ध ग्रंथ आहे. त्या ग्रंथांत झ्वाइगनें दस्तोव्हस्कीच्या जीवनांतील एका महत्त्वाच्या क्षणाचें जें चित्रण केलें आहे, त्याचाच स्वैर अनुवाद प्रस्तुत लेखाच्या रूपानें सादर केला आहे.

प्रस्तुत क्षण दस्तोव्हस्कीच्या आयुष्यांतील आहे. १८४९ सालीं झारशाही उलथून पाडण्याकरतां झालेल्या 'पॅचव्हस्की' ह्या नांवाच्या कटांत भाग घेतल्याच्या आरोपावरून दस्तोव्हस्कीला गोळ्या घालून ठार करण्याची शिक्षा झाली होती. वास्तविक दस्तोव्हस्कीचा ह्या कटाशीं कोणताच संबंध नव्हता. त्याच्या मित्रांनीं त्या कटांत भाग घेतला होता, म्हणून केवळ संशयानें आणि गैरसमजुतीनें झारच्या पोलिसांनीं त्याला ह्या कटांत गोवलें होतें. शेवटीं झारनें त्याची देहान्त शिक्षा कमी करून त्याला जन्मठेपेची शिक्षा दिली. पीटर्सबर्गमधील सेमोनॉव चौकांत २२ डिसेंबर १८४९ च्या पहांटेस दस्तोव्हस्कीला वध-स्तंभाकडे नेण्यांत आलें, त्या वेळच्या प्रसंगाचें, मृत्यूच्या जबड्यांतून सुटून परत येतांना एका प्रतिभाशाली मनानें अनुभवलेल्या एका क्षणाचें हें वर्णन आहे.

—अनुवादक








सोनेरी प्रभेप्रमाणें आपल्या थंडगार आणि रक्त-वर्ण प्रकाशांत स्थिरावली होती.

त्या निःशब्द स्तब्धतेंत ते पुढें सरसावले.

एका लष्करी अधिकाऱ्यानें शिक्षेचा हुकूम वाचला. राजद्रोहाबद्दल त्यांना मृत्यूची सजा झाली होती.

मृत्यु !

त्या शब्दांचा त्या बर्फाच्छादित स्तब्धतेंत एखादी जड वस्तु खालीं आदळल्यासारखा आवाज झाला.

एखादी टणक वस्तु खालीं पडून फुटावी, त्याप्रमाणें, बर्फानें गारठून गेलेल्या त्या पहांटेच्या स्तब्धतेंत थडग्यांतील बधिर आवाजाप्रमाणें त्या शब्दांचा प्रतिध्वनि उमटला.

एखाद्या स्वप्नांत असल्यासारखें त्याला वाटलें.

आपण मृत्यूच्या दारीं आहोंत, हें त्याला कळून चुकलें होतें.

कोणी तरी पुढें आला आणि त्याच्या डोक्या-वरून मृत्यूचें पांढरें वस्त्र टाकलें गेलें.

त्यानें आपल्या सोबत्यांना अखेरचें अभिवादन केलें. त्याचे डोळे जळजळूं लागले व त्याला आपला हुंदका आवरेनासा झाला. दयाळु पण गंभीर नजरे-च्या धर्मोपदेशकानें त्याच्या समोर क्रूस धरला. त्या क्रूसाचें त्यानें हळूंच चुंबन घेतलें. नंतर त्यांनीं त्याला बंदिस्त केलें.त्या दहाजणांच्या त्यांनीं तीन तुकड्या पाड-ल्या आणि मृत्यूच्या खांबास त्यांना करकचून बांधलें.

एक कॉसॅक सैनिक त्याचे डोळे बंद करण्याकरितां पुढें आला. आतां अखेरचा क्षण आला होता. डोळे कायमचेच आंधळे होण्यापूर्वीं त्यानें अधाशी नजरेनें पृथ्वीचें स्वरूप आपल्या डोळ्यांमध्यें सांठवून घेतलें.

अरुणोदयाच्या प्रकाशांत चर्च आरक्त दिसत होतें : जणुं कांहीं अखेरच्या संस्काराप्रमाणें ! पहांटेच्या त्या पवित्र लालीनें आकाश जळत असल्यासारखें वाटत होतें.

त्याचे थरथरते हात वर गेले; देवाला त्यानें वंदन केलें.

तितक्यांत त्याची दृष्टि अंध झाली. त्याचे डोळे बंद करण्यांत आले. शरिरामध्यें रक्त सळ-सळूं लागलें, भयंकर वेगानें सळसळूं लागलें !

एखाद्या प्रवाहाप्रमाणें जीवनाचित्र त्याच्या अंतःचक्षूंसमोरून जाऊं लागलें. प्रकाशाचे पंख फडाडून त्याच्यासमोर गतजीवन उभें राहिलें.

बाल्य : फिकट, विषण्ण, दुःखद. आई आणि बाप, बंधू आणि पत्नी. मैत्रीचे तीन दाणे आणि सौख्याचे दोन पेले. कीर्तीचें एक स्वप्न आणि निंदेची एक प्रस्तावना.

मागें गेलेलें तारुण्यहि त्याच्यासमोर उभें राहिलें. त्या स्मृतींच्या लाटांवर लाटा त्याच्या अंतःचक्षूंवर आदळूं लागल्या. धडधडत्या ज्वालेप्रमाणें तें जीवन त्याच्या धमन्यांमध्यें संचार करूं लागलें. मृत्यूच्या खांबाला करकचून बांधीपर्यंत तें त्यांच्या डोळ्यांसमोर पुनः पुनः उभें राहात होतें. त्याच्या अंतःकरणावर विचारांची गडद आणि जड छाया डोकावूं लागली.

आणि अकस्मात् आपल्याजवळ कुणी तरी येत असल्याची त्याला जाणीव झाली. तीं काळीं स्तब्ध पावलें त्याच्या जवळ जवळ येऊं लागलीं.

त्याच्या काळजावर कुणी तरी हात ठेवला. नाडी मंद होत गेली, क्षीण होऊं लागली आणि थांबली ! आणखी एक क्षण. मग सगळीकडे सामसूम होणार होतें.

कॉसॅक शिपायांची एक तुकडी रांगेंत उभी राहिली. त्यांनीं बंदुका रोखल्या...चाप उघडले... पडघमांचा आवाज झाला. तो क्षण एका शतका-सारखा होता.त्या क्षणीं तो म्हातारा झाला ! "थांबा" एक आवाज ऐकूं आला. एक अधिकारी दौडत आला. त्यानें एक कागद काढला व तो वाचूं लागला. त्याच्या खणखणीत आवाजानें त्या शांततेचा एकदम भंग झाला.

झारनें आपल्या दैवी इच्छेनुसार आरोपीला दया दाखविली होती. त्याची देहान्त-शिक्षा कमी झाली होती.

त्या आवाजाचा प्रतिध्वनि त्याच्या कर्णरंध्रांत घुमला.

काय हें विलक्षण ! तो आवाज त्याला उमजला नव्हता. त्याच्या रक्तवाहिन्यांत लाल रक्त परत खळखळूं लागलें.

बेशुद्धावस्थेंतून तो जागा झाला आणि हलक्या आवाजांत गुणगुणूं लागला. मृत्यु त्याच्या डुळ्या










पडलेल्या अवयवांपासून दूर झाला; बंद डोळे प्रकाशाचें दर्शन घेऊं लागले, अमरतेचें चुंबन घेऊं लागले.

जेलरनें त्याचे पाश सोडले. दोन उष्ण हातांनीं त्याच्या डोक्यावरील पांढरें वस्त्र दूर केलें.

डोळे थडग्यामधून लटपटत उठले, दारुड्या-प्रमाणें ते आजूबाजूस चांचपडूं लागले आणि आपल्या हरवलेल्या जीवनांत ते परत प्रवेश करते झाले.

त्यानें त्या सोनेरी घुमटाकडे दृष्टिक्षेप केला. अरुणोदयाच्या वाढत्या प्रकाशांत तो घुमट गूढ पावित्र्यानें जळत असल्यासारखा वाटत होता. पहांटेचे रक्तरंगी गुलाब त्याला मिठी मारून स्तोत्रें गात होते. घुमटाचें शिखरहि चकाकत होतें. एखाद्या पवित्र खंजिराप्रमाणें तो क्रूस लाल ढगांमध्यें तळपत होता.

प्रातःकाळच्या दाहक कुजबुजाटांत, त्या धर्म-मंदिराच्या शिखरावर आकाश–तें देवाचें पवित्र मंदिर–तरंगत होतें. आणि त्या कंपित वातावरणांत प्रकाशाच्या लाटा उसळत होत्या. हजारों आवाज एकाच स्वरांत हांक मारीत होते.

पहिल्या प्रथमच त्याला आपलीं भयंकर दुःखें ऐकूं आलीं. जणूं कांहीं त्या दुःखांमध्यें मानवतेचीं सारीं दुःखें केंद्रित झालीं होतीं. तो जमिनीवर कोसळला आणि हुंदके देऊन रडूं लागला.

त्याला लहानांचे, दुबळ्यांचे आणि आपणा स्वतःचाच उपहास करणाऱ्या दुर्दैवी स्त्रियांचे आवाज ऐकूं येऊं लागले.

ज्यांना हास्य कधींच माहीत नव्हतें, अशा पददलित, अवमानित आणि एकलकोंड्या मानवांचा त्रागाहि त्याला ऐकूं येऊं लागला. अनाथांचा आक्रोश आणि उपक्षितांचे अश्रूहि त्याला अंतः-चक्षूंसमोर दिसूं लागले.

पीडित, तुच्छित, वनवासी, हुतात्मे, ह्या सगळ्यांचे आवाज तो ऐकत होता. एका प्रभावी आणि विजयी स्वरांत ते आवाज विशाल आकाशांत वरवर जात होते.

आणि त्याला साक्षात्कार झाला : दुःखांची मालिका ही देवाकडे जाणारी वाट होती. जे दैवाचे मानकरी सुखोपभोग घेते होते, ते शिक्षाप्रमाणें जमिनीवर आपटत होते.

वर आकाशांत प्रकाश पसरत चालला होता; भरतीच्या लाटांप्रमाणें पसरत चालला होता. आणि त्यांत दुःखी मानवांचे असंख्य आवाज मिसळत होते. त्याला माहित होतें कीं, देव त्या आवाजाची दाद घेणार होता. जे निष्पाप आणि अभागी होते, त्यांना देव विनाकारण शिक्षा न करतां त्यांच्यावर दयेचा वर्षाव करीत होता. अतीव करुणेनें निळें आकाश देदीप्यमान दिसत होतें. तो अमर प्रकाश होता.

ज्यानें जिवंतपणें मृत्यु अनुभविलेला असतो, त्याला दुःखांत सुख आणि त्रासांत आनंद वाटत असतो.

एक देवदूत खालीं पृथ्वीवर अवतरला आणि आपल्या पवित्र प्रेमाचे किरण त्यानें त्याच्या हृदयांत सोडले; तें प्रेम कीं ज्यानें दुःखांना रम्य रूप दिलें होतें.

तो खालीं कोसळला. जगांतील सारीं दुःखें आपल्या देहामध्यें एकवटलीं आहेत असें त्याला वाटूं लागलें. त्याच्या शरीराला कंप सुटला आणि तोंडांतून पांढरा फेंस बाहेर पडूं लागला. त्याचा चेहरा विद्रूप दिसूं लागला आणि डोळ्यांतून अश्रूंचा पूर लोटूं लागला. ते आनंदाचे अश्रू होते. मृत्यूचा स्पर्श झाल्यानंतर त्याच्या हृदयांत ही जीवनाची गोडी निर्माण झाली होती.

त्याचें हृदय फटके घेण्यास आणि बळी जाण्यास आतुर झालें होतें. त्याला क्रुसावर चढलेल्या हुतात्म्याच्या जीवनाचा साक्षात्कार झाला होता. मृत्यूच्या त्या दाहक चुंबनानंतर, दुःखाच्या नांवानें तो जीवनावर प्रेम करण्यास शिकला होता. सैनिकांनीं त्याला मृत्यूच्या खांबा-पासून मागें ओढलें. त्याचा चेहरा फिकट, पुसल्या-सारखा पांढरा फटफटीत पडला होता. त्याची दृष्टि स्वप्नसृष्टींत मग्न झाल्यासारखी दिसत होती. आणि त्याच्या थरथरत्या ओठांवर कारामाझॉवचें[२] क्षीण हास्य विलसत होतें.

२ 'ब्रदर्स कारामाझॉव' ह्या दस्तोव्हस्कीच्या कादंबरींतील नायक.








श्री. वि. गो. इंगोलीकर

# लो क सा हि त्य

आजच्या साहित्यिकांनीं आपल्या प्रतिभेचा उपयोग ' बहुजनहिताय ' करावा, असा त्यांना उपदेश केला जातो. वाङ्मय हें जसें मनोरंजनाचें साधन आहे तसें तें लोकशिक्षणाचेंहि माध्यम आहे, आजच्या साहित्यिकांनीं सुशिक्षित आणि लब्धप्रतिष्ठ समाजाकरितांच फक्त साहित्य निर्माण न करतां, साहित्यांत जनसाधारण जीवनाचा आविष्कार करावा असें आमच्या लेखकांना सांगण्यांत येतें. असें प्रतिपादन करीत असतांना त्याबरोबरच साहित्यसंपदा ही एकाच वर्गाच्या मालकीची नसून त्या संपदेवर समाजाचा हक्क आहे, त्याप्रमाणें या संपदेचा विनियोग समाजाकरितांच झाला पाहिजे, असेंहि विधान केलेलें आढळतें.

एकीकडे साहित्यिकाला असा उपदेश केला जात आहे तर, दुसरीकडे लोकसाहित्याचा उदोउदो करणारे लोकसाहित्याचे प्रचारकहि आढळून येतात. हे प्रचारक लोकसाहित्याचा अर्थ सांगतांना रशियन लेखक मॅक्झीम गॉर्की, फ्रेंच लेखक एमील झोला, रूसो आणि ह्यूगो या लेखकांच्या साहित्याचा लोकसाहित्याचा मानदंड म्हणून गौरव करतात व या लेखकांच्या साहित्याला आदर्श समजून त्याप्रमाणें साहित्यनिर्मिति करण्याचा ते आमच्या लेखकांना उपदेश करतात.

लोकसाहित्याच्या त्या मानदंडाला आदर्श समजून साहित्य निर्माण करण्याचा उपदेश करणाऱ्यांनीं त्या साहित्यनिर्मितीमागें असणारा उद्देश सफल होईल काय, याचा विचार कधीं केला काय ? आजपर्यंत लोकसाहित्याच्या वेषाखालीं जें साहित्य निर्माण झालें आणि होत आहे, तें खरोखरच लोकांचें साहित्य आहे काय ? या लोकसाहित्याविषयीं साधारण समाजाला कितपत आत्मीयता वाटते ? या लोकसाहित्याकडे साधारण समाज आकृष्ट झाला काय ?—या गोष्टींचा विचार प्रथम झाला पाहिजे.

अभिजात साहित्याच्या युगांत साहित्यिकांनीं जनसाधारण जीवनाच्या अनुभवांची उपेक्षाच केलेली दिसून येते. कारण अभिजात साहित्याच्या मनोवृत्तीवरून त्यांचें साहित्य फक्त वरिष्ठ वर्गाच्या अनुभवांचेंच चित्रण होतें. अभिजात युगांतील कलावंत विशिष्ट वर्गाचा आश्रित राहिल्यामुळें वरच्या वर्गाला जसें आवडेल त्याप्रमाणें त्याला साहित्य निर्माण करावें लागलें. याचा परिणाम असा झाला कीं, तो समाजजीवन किंवा समाजाची भौतिक परिस्थिति यापासून पराङ्मुख झाला. समाज दोन वर्गांत वांटला गेल्यानंतर अभिजात साहित्याच्या युगांत त्या वर्गांचा आध्यात्मिक संबंध तुटला;साहित्यिक अर्थातच वरिष्ठ वर्गाच्या आश्रयाखालीं असल्यामुळें त्याच्या कलेचें जग त्याच वर्गापुरतें परिसीमित झालें. म्हणूनच अभिजात साहित्य हें वर्गीय दिसतें. साहित्यांतील हें एकांगी स्वरूप आज काढून टाकून या लोकशाहीच्या काळांत साहित्य जर लोकाभिमुख झालें, ' साहित्य समाजाचें आहे, साहित्याची खरी शक्ति समाजच आहे ' या जाणिवेनें समष्टिजीवनाचें आविष्करण आजच्या साहित्यिकांनीं आपल्या वाङ्मयांत केलें, तर तें साहित्य लोकजीवनानुभूतीचें साहित्य होऊन खरें लोकसाहित्य ठरेल.

पण आजपर्यंत जें साहित्य लोकांच्या नांवावर निर्माण झालें तें खरोखरीच लोकांचें साहित्य आहे, असें म्हणतां येईल काय ? त्या लोकसाहित्याचा







उपयोग जनता स्वतःसाठीं करून घेते काय ? त्या साहित्यांत लोकांच्या जीवनाचें यथार्थ प्रतिबिंब आपणांस दिसतें काय ?—या प्रश्नांचा विचार करतां आजपर्यंत निर्माण झालेल्या लोक-साहित्यांत प्रामुख्यानें कांहीं दोष आढळून येतात, ते असे : कथा, कादंबऱ्या आणि नाटकें यांतून लोकांच्या संस्कृतीचें, जीवनाचें व त्याच्या बोलीचें अनुकरण दिसून येतें. पण त्या चित्रणांत जिवंतपणा मुळींच वाटत नाहीं. त्या जीवनाची सृष्टि बरीचशी निर्जीव आणि काल्पनिक वाटते. त्यांच्या चित्रणांत यथार्थता मुळींच प्रत्ययाला येत नाहीं. जी भाषा किंवा बोली पात्रांच्या संभाषणांत आलेली दिसते, ती भाषा निव्वळ कृत्रिम आणि काल्पनिक वाटते. पात्रांच्या संभाषणांत केवळ त्यांची बोली—तीहि काल्पनिक—दाखविली म्हणजे कांहीं तें लोकजीवनाचें चित्रण ठरत नाहीं. आणखी विशेष हें कीं, या तथाकथित लोकसाहित्यांत केवळ मध्यमवर्गीय व्यक्तित्व प्रगट होत असतांना दिसतें. साहित्यांतील या सदोषतेचें एक कारण असें आहे कीं, साधारण जनतेच्या जीवनाशीं लेखक समरस होत नाहीं, त्यानें समरस होण्याचा प्रयत्न केलाच तर तो मध्यमवर्गीय व्यक्तित्व कायम ठेवून—म्हणजे पूर्वसंस्कारांनीं बनलेला दृष्टिकोन कायम ठेवूनच कनिष्ठवर्गाच्या जीवनाचें आकलन करण्याचा प्रयत्न करतो. त्याचें स्वतःचें मध्यमवर्गीय व्यक्तित्व सुटतां सुटत नाहीं. खालच्या वर्गांतील जनतेला जीवनाविषयीं काय वाटतें, याचें यथार्थ आकलन आपलें व्यक्तित्व कायम ठेवणाऱ्या लेखकांना कसें होणार ? परकीय भूमिकेवरून जन-साधारण जीवनाशीं समरस होऊं म्हटलें तरी तें शक्य नाहीं. जनसाधारण जीवनाचें यथार्थ आकलन करून घेण्यास आपला वर्गीय दृष्टिकोन प्रथम सोडला पाहिजे आणि नंतरच त्यांच्या जीवनाचें आकलन करण्यास पुढें झालें पाहिजे. खेडुतांना जीवनाचा कसा अनुभव येतो याचा ठाव घेण्यास त्या खेडुतांच्या जीवनदृष्टीचा प्रथम स्वीकार केला पाहिजे. पण आपली भूमिका कायम ठेवून त्यांच्या जीवनाचें ज्ञान होणें हें कधींहि शक्य नाहीं. विल्यम नहल या शोषितवर्गीय लेखकानें 'लंडन मर्क्यूरी' या इंग्रजी वृत्तपत्रांत अशा भाडोत्री लेखकांना असा सवाल केला होता: "What have this tribe of middle-class lawyers, parsons, and scribes to tell me about my class ? How can they probably know what life looks like to us ?...The truth is that...it requires very powerful faculties of imagination indeed, to portray accurately and with any degree of fulness characters that breathe, out of his own little social tradition".('हे मध्यम-वर्गीय वकील, धर्मोपदेशक आणि लेखक यांना माझ्या वर्गाबद्दल काय सांगावयाचें आहे ? आम्हांला जीवनाचा कसा अनुभव येत आहे हें ते कसें जाणूं शकणार ?...खरें असें कीं, पूर्वपरंपरागत संस्कारांनीं जखडल्या गेलेल्या लेखकांना दुसऱ्या वर्गाच्या जीवनाचें यथार्थ चित्रण करण्यास प्रतिभेची अद्भुत किमया आवश्यक आहे.') त्याचें विधान या दृष्टीनें खास मननीय आहे. लोकसाहित्याचा हा मानदंड साहित्यनिर्मिति करण्यास आदर्श समजणें हें फार सोपें काम आहे. पण साधारण जनतेच्या जीवनाचें यथार्थ आणि जिवंत चित्रण करणें फार अवघड आहे.

लोकसाहित्यसृष्टींत प्रत्ययाला येणाऱ्या निर्जीवतेचें आणखी कारण असें आहे कीं, लेखकवर्ग समाजाचा प्रथम अभ्यास करीत नाहीं. समाजांत रहात असतांना जनसाधारण जीवन डोळ्यांनीं पाहणें निराळें आणि खालच्या वर्गांत शिरून त्याच्या अंतरंगाचा ठाव घेणें निराळें ! वरुणसृष्टींतील विलक्षण चमत्कारांचें निरीक्षण करण्याकरितां ज्याप्रमाणें सागराच्या अंतरंगाचाच ठाव घ्यावा लागतो, त्याचप्रमाणें जनसाधारण जीवनाच्या यथार्थतेचें आकलन करण्यास त्या वर्गाच्या अंतरंगांतच शिरलें पाहिजे. जनतेला आपल्या जीवनाविषयीं काय वाटतें, जीवनाकडे पाहण्याचा तिचा दृष्टिकोन कोणता आहे, सांस्कृतिक आणि भौतिक जीवनाशीं ती कोणतें नातें ठेविते, जीवनाविषयीं ती काय काय कल्पना करते, या साऱ्या परिस्थितीचें यथार्थ







आकलन रस्त्यावरील चार-दोन व्यक्तींचें संभाषण ऐकून होत नाहीं. तिच्या जीवनांत शिरून जीवनाचा अभ्यास केला तरच या गोष्टी कळतील. आणि नंतर त्या आत्मानुभवाचें चित्रण केलें तरच त्या चित्रणांत स्वाभाविकता, जिवंतपणा आणि यथार्थता हे गुण प्रकट होतील. रशियन लेखकाविषयीं व्ही. किरपोटीन या लेखकानें म्हटलें आहे :

' Soviet literature is unusually thirsty for life; it ceaselessly watches life, and learns from life. The best Soviet writers would be ashamed to write on a theme that was not of a social character or on a theme that they had not studied. This knowledge of life is often achieved through direct participation."

' रशियन साहित्य जीवनाकरितां तहानलेलें असतें; जीवनाचें सतत निरीक्षण करून तत्संबंधीं यथार्थ ज्ञान करून घेण्यास तें झटत असतें. समाजजीवनाव्यतिरिक्त दुसऱ्या कोणत्याहि विषयावर किंवा ज्या विषयाचा अभ्यास केला नाहीं त्या विषयावर लिहावयास श्रेष्ठ साहित्यिक लाजेल ! जीवनाचा स्वतः अनुभव घेऊनच त्याचें यथार्थ ज्ञान होऊं शकतें ! ' ज्या लेखकाला जनसाधारण जीवनाची अनुभूति नाहीं त्याला या जीवनाचें यथार्थ चित्रण कसें करतां येणार ! सारांश, साधारण जनतेच्या जीवनाशीं प्रत्यक्ष तादात्म्य पावून मिळविलेल्या अनुभवांचें सहानुभूतीनें केलेलें चित्रण ज्या साहित्यांत असेल त्याला लोकांचें साहित्य म्हणतां येईल.

साहित्यसृष्टि ही जितकी लेखकावर अवलंबून असते तितकीच ती वाचकांवरहि अवलंबून आहे. साहित्याच्या उपयोगितेचा विचार करीत असतांना लेखकाचा आणि वाचकाचा सारखाच विचार करणें इष्ट आहे. आमच्या लेखकवर्गानें जनतेकरितां लोकसाहित्य निर्माण करावें अशी आमची इच्छा आहे. पण, लोकसाहित्याचा खरा उपयोग तेव्हांच होईल, कीं ज्या वेळेस साधारण जनता त्या साहित्याचा उपयोग करून घेण्यास उत्सुक असेल ! जोंपर्यंत त्या लोक-साहित्याचा उपयोग जनता करून घेऊं शकत नाहीं किंवा त्या साहित्याविषयीं लोकसमाज अनुदारवृत्ति किंवा औदासीन्य प्रकट करीत असते, तोंपर्यंत तें साहित्य लोकांचें साहित्य होणार नाहीं. याप्रमाणें आजपर्यंत जें साहित्य लोकांच्या नांवांवर निर्माण झालें त्याचा उपयोग जनता करून घेत आहे काय ? त्या साहित्याविषयीं त्यांच्या अंतःकरणांत आत्मीयता आहे कीं उदासीनता ? या लोक-साहित्याचा खरोखर उपयोग होईल असें वाटतें का ? या-बरोबरच असाहि प्रश्न येतो कीं, अभिजात वाङ्मयाचा कांहींच का उपयोग जनतेकरितां होत नव्हता ?

खरी गोष्ट ही आहे कीं, जनसाधारण समाज अभिजात साहित्याचा उपभोग घेण्यास शैक्षणिक, आर्थिक आणि सांस्कृतिक परिस्थितीनें असमर्थच राहिला ! ज्याच्या अंतःकरणांत गंगेविषयीं श्रद्धा नसते तो काशीला असतांनाहि गंगेत स्नान करून पदरीं पुण्य जोडीत नाहीं आणि ज्याची गंगेवर श्रद्धा असते तो पायीं दूरचा प्रवास करीत गंगेचें दर्शन घ्यावयास जातो. त्याचप्रमाणें साहित्याविषयीं ज्याला आत्मीयता वाटते तो परकीय वाङ्मय असलें तरीहि तें मिळविण्याची खटपट करतो.

साहित्यसृष्टीपासून बहुजनसमाज दूर आहे; साहित्याविषयीं तो समाज उदासीन आहे, त्याला साहित्याबद्दल आत्मीयता वाटत नाहीं. जें साहित्य प्रचारकांच्या दृष्टीनें लोकसाहित्य नाहीं, त्या साहित्या-पासून, आणि त्यांच्या दृष्टीनें जें लोकसाहित्य आहे त्या लोकसाहित्यापासूनहि बहुजनसमाज अगदीं दूर आहे. जें लोकसाहित्य निर्माण झालें त्याचा उपयोग तरी होत आहे काय ? रेडिओवर खेडुतांकरितां कांहीं कार्यक्रम होतांना दिसतात. ते कार्यक्रम मुद्दाम खेडुतांकरितां आणि अशिक्षित समाजाकरितां रेडिओवर केले जातात; पण त्या कार्यक्रमांचा उपयोग खेडुत लोक करून घेण्यास समर्थ आहेत काय ? या कार्यक्रमांचा उपयोग वास्तविक खेडुतांकरितां होतो काय ? आपल्याकरितां रेडिओवर कांहीं कार्यक्रम होत असतात याची त्या बिचाऱ्यांना कल्पनाहि नसेल !








यदाकदाचित् एखाद्या खेडुतानें हा कार्यक्रम ऐकला, तर त्याला आपली नक्कल रेडिओवर होत असते याची जाणीव होऊन कदाचित् अतिशय वाईट वाटेल. शेवटीं हे कार्यक्रम खेडुतांकरितां न होतां, शहरांत बंगलींत राहणाऱ्या सुशिक्षितांकरितांच होतात ! लोकसाहित्याची परिस्थिति अशी शोचनीय आहे. लोकसाहित्य निर्माण झालें पण त्याचा उपयोग खेडुतांकरितां आणि शहरांतील अशिक्षित समाजाकरितां होत नाहीं. त्या साहित्याबद्दल ते अगदींच उदासीन आहेत. वाचक साहित्याकडे आकृष्ट व्हावा लागतो. त्याला साहित्याबद्दल ओढ असावयास पाहिजे. तरच त्या साहित्याबद्दल त्याला आत्मीयता निर्माण होईल ! या दृष्टीनें मॅक्झिम गॉर्की आदि लेखकांचें भाषांतरित साहित्य जनतेसमोर ठेविलें तरीहि साहित्यसृष्टीकडे जनता आकृष्ट होणार नाहीं.

जनतेच्या अभिरुचीप्रमाणें साहित्यांत बाजारू भाषा किंवा बोली घालून तें साहित्य निकृष्ट दर्जावर आणणें हें त्या जनतेच्या मनांत साहित्याविषयीं आपुलकी निर्माण करण्याचें साधन नव्हे. त्याला साहित्य किंवा वाङ्मय ही संज्ञा कदापि मिळणार नाहीं. साहित्याचा आत्मा भावगांभीर्य आहे. वाङ्मयाचें पहिलें कर्तव्य केवळ वाचकाची मानसिक पातळी अधिक उन्नत करणें आहे. जनतेची पसंती हाच साहित्याचा मानदंड नाहीं, किंवा जनतेची आराधना करणें हेंच साहित्यिकांचें कर्तव्य नाहीं. साहित्यानें उच्च कोटीचेंच स्थान ठेविलें पाहिजे. देवतेला स्वर्गांतून ओढून भूतलावर आणल्यावर तिला मानवी स्वरूप दिलें तर तें योग्य होईल. पण तिला आणखी रसातळांत पाठविण्याचा प्रयत्न करणें मात्र अयोग्य आहे. साहित्याची भाषा सुबोध असली पाहिजे पण भावनागांभीर्याचा नाश करावा असें कोण म्हणेल ? जनसाधारण जीवनाचा आविष्कार साहित्यांत असला आणि त्या चित्रणांत भाव, रस, यांचा लाभ होत नसला तर त्याला साहित्य कोण म्हणेल ? इमर्सननें साहित्यांत भावनागांभिर्याला प्राधान्य देऊन तिचा गौरव केला आहे : " The effect of any writing on the public mind is mathematically measurable by its depth of thought. If it awakens you to think, if it lifts you from your feet with the great voice of eloquence, then the effect is wide, slow, permanent over the minds of men. If the pages instruct you not, they will die like flies in the hour." —(Poetry and Imagination. )

साहित्याचा हा आत्मा कळण्यास वाचकांचीहि पायरी तितकीच वर पाहिजे. साहित्याची रससृष्टि जितकी साहित्यिकांवर अवलंबून असते तितकीच ती वाचकांवर असते. रसदृष्टि असल्याशिवाय साहित्याचें मर्म काय कळणार ? आपल्या संकलित नाटकांची भूमिका सांगतांना शॉ म्हणतो : " तुम्हीं काय समजतां कीं जीं नाटकें लिहिण्याकरितां मी माझी सारी जीवनसाधना खर्ची घातली, तीं नाटकें एक वेळां वाचून समजूं शकतील ? प्रतिवर्षीं निदान दोन-तीन वेळ या नाटकांचें पारायण केलेंत, तर कदाचित् दहा वर्षांनंतर तुम्ही या नाटकांचें मर्म जाणूं शकाल. याचकरितां मी या संकलनाला भक्कम कापडबांधणी करवून घेतली ! " शॉच्या या म्हणण्यांत त्याचा अहंकार जरी प्रत्ययाला येत असला तरी त्यांत सत्य नाहीं असें कोण म्हणेल ! अभ्यास ही साहित्याची एक साधना आहे.

---

## महाराष्ट्रीय संस्कृतीचें संशोधन : कांहीं विचार [ पान ५३ वरून पुढें चालू ]

रचनेचें काम करतां येईल. विचारवंतांचें आणि संशोधकांचें या साधनसामग्रीकडे लक्ष वेधणें एवढाच या लेखाचा हेतु आहे. कोणतेहि सिद्धान्त मांडण्याचा प्रयत्न यांत केला नाहीं. महाराष्ट्राच्या संस्कृतीचा साकल्येंकरून विचार करतांना ओघानें जे कांहीं विचार सुचले ते व्यक्त केले आहेत. अशा दिशेनें संशोधन होणें हें आज आवश्यक आहे. आपल्या गुणदोषांचें मूल्यमापन करून गुणांचें वर्धन आणि दोषांचें निर्मूलन करण्याचा प्रयत्न करण्याच्या कामीं असें सांस्कृतिक संशोधन खाचित उपयोगीं पडेल

# सारसंकलन

## संत नामदेवांची ६०० वी पुण्यतिथि

आषाढ वद्य त्रयोदशीच्या दिवशीं नामदेवांच्या अवतारसमाप्तीला ६०० वर्षे झालीं. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनांत वारकरी संतांचें कार्य फार मोठें आहे, आणि त्यांतहि संत नामदेव यांची थोरवी विशेष स्वरूपाची आहे. हिंदी भाषेंतील कबीर, सूरदास यांच्या भजनांना जो सार्वत्रिक मान मिळाला तो मराठींतील नामदेवांच्या अभंगांना मिळाला. पंजाब-सरहद्दप्रांतापलीकडे, त्यांच्या शिष्यांनीं गुरूची कीर्ति फैलावून दिली. शीखांच्या 'गुरुग्रंथां'त गुरु अर्जुनदेवांनीं संत नामदेवांचीं पद्यें अंतर्भूत केलेलीं आहेत. हें भाग्य इतर कोणा मराठी संतांच्या वांट्याला आलेलें नाहीं. असे हे नामदेव तुकारामबुवांचें स्फूर्तिस्थान होते. वारकरी-टाळकरी भजनाच्या धुनींत "निवृत्ति ज्ञानदेव सोपान मुक्ताबाई। एकनाथ नामदेव तुकाराम" अशी आपल्या श्रेष्ठ पंथकर्त्यांची स्मृति गातात तें अन्वर्थकच आहे. ज्ञानेश्वर, एकनाथ, व तुकाराम यांच्या तुलनेनें चालू काळांत नामदेवाचा उल्लेख कमी प्रमाणांत होतो हें खरें. त्याचीं जीं कारणें प्रा. शं. वा. दांडेकरांसारखे दीक्षावान् वारकरी पंडित सांगतात ('प्रसाद,' सप्टेंबर १९५० अंक) तीं संक्षेपानें अशीं :

(१) आषाढ वद्य त्रयोदशीला नामदेवांनीं समाधि घेतली. नामदेवांची समाधि पंढरपुरासच आहे. त्यामुळें मुद्दाम स्वतंत्र यात्रा भरण्याचें कारण उरलें नाहीं. (२) नामदेवांच्या मागें त्यांचे पुत्र किंवा शिष्य विशेष नसल्यामुळें त्यांची कीर्ति वाढविली गेली नाहीं. तुकारामाला निळोबारायांसारखे शिष्य लाभले तसेच त्यांचे मुलगेहि साक्षेपी निघाले. (३) नामदेव हे, ज्ञानेश्वरांचे समकालीन व ज्ञानेश्वरांचे शिष्य जे विसोबा खेचर, त्यांचे शिष्य. त्यामुळें त्यांच्या तुलनेनें नामदेवांचें महत्त्व प्रशिष्यासारखें झालें. त्यांना स्वतंत्र स्थान उरलें नाहीं.

तें कसेंहि असो. परंतु त्यांचें ऐतिहासिक कार्य असाधारण आहे व त्यांचे कित्येक अभंग तर तुकारामाच्या उत्कृष्ट अभंगांएवढेच रसाळ आहेत.

पतीतपावन नाम ऐकुनी आलों मी दारां
पतीतपावन न होसि म्हणुनी जातों माघारा ॥

या अत्यंत प्रसिद्ध पद्यांत शेवटीं नामदेव म्हणतात :

नामा म्हणे देवा तुझें न लागे मज कांहीं ।
प्रेम असों चित्तीं म्हणुनी लागतसें पायीं ॥

असा प्रेममय मानवधर्म ही त्यांची निष्ठा होती. या मानवधर्माची श्रेष्ठता प्रसिद्ध रसिक व चिकित्सक श्री. पु. मं. लाड यांनीं आपल्या प्रासादिक शैलींत पुढीलप्रमाणें ("साधना" १२ ऑगस्ट) वर्णन केली आहे.

"माणसांचीं मनें भारून टाकणारा तो अद्भुत जादूगार होता. 'खेचरू विसा। प्रेमाचा पिसा।'. त्यानें नामदेवाला उपदेश देऊन 'पदापिंडा विवर्जित' केला. हें प्रेमपिसें निःसंशय सांसर्गिक असतें. तें आपणासारिखें तात्काल करितें. इतरांस जो वीर वाटतो तो घरांतल्या दास दासींस तसा भासत नाहीं असा साधारणतः अनुभव येतो; पण या वैष्णववीराचा प्रतापच असा होता कीं त्याच्या दासीनें-जनीनें 'नाम तें रूपा दळियेलें सर्व' आणि मग साहजिकच पंढरीचा राव पीठ भरावयाला बसला. घरच्या बाभळीचें जेथें चंदन झालें तेथें दूरवर सुवास पसरला तर नवल कोणतें? पंढरपुरापासून पंजाबापर्यंत नामदेवाची ख्याति पसरली होती. हिंदुस्थानांत असा एकहि संतचरित्रकार नाहीं कीं जो त्याचे पवाडे गात नाहीं. हारमाळा नरसी-



अनुक्रमणिका






मेहेल्याची असो अगर नसो, इतकें स्पष्ट कीं सौराष्ट्रांत नामदेवाची स्मृति शंभर वर्षांनंतरदेखील ताजी होती. पंजाबांतले मठ त्यानें स्थापन केले असोत अगर नसोत, त्याची परंपरा प्रभावी ठरली व ती शीखांच्या आदिग्रंथांत जतन करून ठेवली आहे. राजकीय अंमलापेक्षां संस्कृतीचे संबंधच चिरकाल टिकतात; कारण प्रेमसंबंधांनीं माणसें एकजीव होऊन जातात. मुसलमानांच्या आक्रमणामुळें विस्कळित होणाऱ्या समाजाची, समतेचा पाया मजबूत करून, ज्यांनीं प्रेमानें बांधणी केली त्या विधात्यांत नामदेवाची गणना प्रामुख्यानें केली पाहिजे. ह्या मानवधर्माचा तो आद्य प्रचारक होता. नामदेवानंतर रामानंद आणि चैतन्य यांनींहि हिंदुस्थानभर फिरून हें कार्य चालू ठेवलें. असला यात्रा-प्रचार किती यशस्वी ठरतो याची कल्पना गांधीजींच्या दांडी यात्रेवरून आपणांस करतां येईल. विशाल दृष्टि ठेवून सगळ्या राष्ट्रभर प्रेमधर्माचा प्रसार करणारा नामदेव खरा महाराष्ट्रीय होय. 'चिंता करितों विश्वाची' अशी ज्याच्या मनाची ठेवण त्यालाच महाराष्ट्रीय हें बिरुद साजेल. लघुचेतसाला महाराष्ट्रीय म्हणवून घेण्याचा अधिकार नाहीं, हें नामदेवाच्या चरित्रावरून आपण आधीं शिकलें पाहिजे."

### न्या तेलंगांची शतसंवत्सरी

न्या. तेलंगांच्या कार्याचें स्मरण त्यांच्या शंभराव्या जन्मदिनानिमित्त (ता. ३० ऑगस्टला) मराठी वृत्तपत्रांनीं केलें. आधुनिक महाराष्ट्राच्या व भारताच्या शिल्पकारांपैकीं न्या. तेलंग हे एक होते. केवळ राजकीय व 'राष्ट्रीय' दृष्टिकोनांतून व्यक्तींकडे पाहाणारांना न्या. तेलंगांचें कार्य म्हणजे त्यांनीं वेबरला रामायणाबाबत दिलेला रोखठोक जबाब हें होय, एवढेंच माहीत असतें. परंतु आजच्या पिढीनें अधिक विस्तृत अशा सर्वस्पर्शी सामाजिक कार्याच्या दृष्टीनें रानडे, तेलंग वगैरे महापुरुषांकडे पहावयास शिकलें पाहिजे. ती सर्व पिढीच्या पिढीच महापुरुषांची होती; आणि त्यानंतरची टिळक—आगरकर—गोखले यांची पिढीहि अशीच निघाली. महाराष्ट्राचें हें केवढें भाग्य कीं त्याच्या भूमींत अशीं नररत्नें जन्मून त्यांनीं आपलें कार्य येथें करावें.

न्या. काशीनाथ त्रिंबक तेलंग यांची बुद्धि असाधारण तीक्ष्ण होती व गाढ व्यासंगानें तिला खोलीहि लाभलेली होती. कायद्याच्या विषयांत तर ती अप्रतिरोध चालेच, पण प्राच्यविद्या व संशोधन यांबाबतहि ती तितक्याच लीलेनें संचार करी. परंतु त्यांचें खरें मोठेपण त्यांच्या विशाल सामाजिक दृष्टिकोनांत दिसून येतें. न्या. रानडे यांच्यासारख्या सर्वश्रेष्ठ महापुरुषानेंहि आपल्याला "तेलंग संप्रदाया" (The Telang School)-चें म्हणवून घ्यावें इतक्या योग्यतेची ती दृष्टि होती. श्री. पु. मं. लाड यांनीं ('साधना' ९-९-५०) तेलंगांच्या या कार्याचें दिग्दर्शन पुढीलप्रमाणें केलें आहे :

"आज आर्थिक विषमतेमुळें असंतोषाचें वातावरण फैलावतें आहे, तर तेलंगांच्या जन्मकाळीं परक्या सत्तेविरुद्ध राजकीय असंतोष धुमसत होता. सत्तावन सालच्या बंडांत त्या असंतोषानें पेट घेतला खरा, पण दास्य भस्मसात् करण्यास तो असमर्थ ठरला. तेलंगांचा जन्म म्हणजे त्या अग्निदिव्यांतून निर्माण झालेल्या एका नव्या परंपरेचा जन्म असें आतां मागें वळून पाहणाऱ्यास स्पष्ट दिसतें. ती परंपरा सर्वांगीण विकासाच्या प्रगतीची होती. विनाश पसरविणाऱ्या तुफान गतीची नव्हती. हटातटाला पेटून मोडतोड करण्यापेक्षां समंजस तडजोडीनेंच कार्यभाग अधिक लवकर साधतो असा तिचा विश्वास होता. भेदाभेदांचे भ्रम हळूंहळूं निरसून समाज बळकट करून बहुजनांचें हित साधावें हें त्या परंपरेचें ध्येय होतें. ग्लानि आलेल्या समाजांत लोकहिताची बळकट श्रद्धा गांठीं असावी लागते हें ह्या परंपरेनें शिकविलें; आणि त्या श्रद्धेनेंच हिंदु, मुसलमान, पारसी यांची एकजूट होऊं शकते, हें तेलंग, तैय्यबजी, मेथा—ज्यांचा 'त्रिकूट' असा लॉर्ड हॅरिस उल्लेख करीत असत—यांनीं शाबीत केलें. राष्ट्रीय ऐक्याची ती त्रिमूर्तिच होती असें लोकांनीं मानिलें.

"त्या काळापेक्षांहि आज ती परंपरा उज्ज्वल राखणें अधिक आवश्यक आहे. उतावळीच्या उलथापालथीनें आपल्या ध्येयांची स्थिर स्थापना होणार नाहीं हें इंग्रजी जीवनाचें तत्त्वज्ञान तेलंगांनीं आपल्या एका प्रख्यात मराठी व्याख्यानांत मांडलें होतें. शतसंवत्सरें गेलीं तरी तीं वचनें ताजींच वाटतातः 'जें कांहीं व्हावयाचें तें बेतानें, आणि








दोन्ही पक्षांच्या समजुतीनें होऊन सर्व देशाची स्थिति कायम ती कायम, इतकेंच नव्हे तर उलटी सुधारलेली अशी झाली. कारण ज्या वेळेस अमुक एक फेरफार करणें अवश्य आहे असें दिसून येतें त्या वेळेस इंग्रज लोक फार आग्रह न धरितां ते फेर फार करीत जातात. यामुळें फेरफार करण्याच्या प्रवृत्तीला फार प्रतिबंधापासून उत्पन्न होणारा जोर येत नाहीं; तो वेळच्या वेळीं फेरफार झाल्यानें कमी, क्षीण होऊन जातो; आणि घोंटाळा होत नाहीं. हा घोंटाळा टाळावा अशी आपली इच्छा असेल तर दुराग्रही तत्त्वज्ञानें सोडून व स्वार्थ बाजूला सारून आर्थिक व्यवस्थेंत योग्य ते फेरफार करण्यास आपण उद्युक्त झालें पाहिजे हाच तेलंगांच्या परंपरेचा आजचा संदेश. ''

न्या. तेलंग यांना मराठी भाषेंतून पाश्चात्यांचें ज्ञानभांडार लोकांपुढें आणण्याची महान् इच्छा होती. '' मराठी भाषेची सर्व प्रकारें अभिवृद्धि करण्यासाठीं प्रयत्न करणें हें तेलंग आपलें एक अवश्य कर्तव्य समजत आणि त्याप्रमाणें त्यांचे सतत प्रयत्न आजन्म चालू होते. ते खरे सारस्वत होते '' असें त्यांचें वर्णन ' विविधज्ञानविस्तारा 'चे संपादक कै. रावसाहेब मोरमकर यांनीं केलें आहे. न्या. तेलंगांनीं जर्मन कवि लेसिंग याच्या नाटकाचें 'शहाणा नेथन' असें भाषांतर मराठींत केलें. तसेंच चाल्मर्सकृत ' Local Self-Government ' या इंग्रजी ग्रंथाचें त्यांचें भाषांतर १८८५ च्या अखेरीस प्रसिद्ध झालें.

## सृष्टवस्तुविज्ञानाची श्रेष्ठतर बाजू

गुजराथ साहित्यसभेतर्फे गुजरातेंत कला, विज्ञान, साहित्य यांच्या क्षेत्रांत श्रेष्ठ यश प्राप्त करणाराचा सन्मान करण्याच्या हेतूनें दरवर्षी ' रणजीतराम सुवर्णपदक' दिलें जातें. सन १९४७ चें हें सुवर्णपदक गुजरातचे अग्रगण्य सृष्टिविज्ञानविद् (Naturalist) श्री. हरि नारायण आचार्य यांना दिलें गेलें. श्री. आचार्य यांनीं सन १९३८ सालीं '' गुजरात-प्रकृति-मंडळ'' स्थापलें व 'प्रकृति' नांवाचें त्रैमासिक सुरू केलें. अशा प्रकारें गुजरातेंत या विषयाची आवड उत्पन्न करण्याचें व प्रत्यक्ष काम करण्याचें महत् कार्य श्री. आचार्य यांनीं केलें आहे.

वरील पदकार्पण करण्याच्या समारंभप्रसंगीं त्यांनीं जें विद्वत्तापूर्ण भाषण केलें त्याचा उत्तरार्ध सर्वसाधारणपणें सर्वांनाच उद्बोधक वाटण्यासारखा आहे. त्यांतील कांहीं भाग '' प्रस्थान '' मासिकाच्या जुलैच्या अंकांत आला आहे व त्यांतूनच पुढें संक्षेपानें दिला आहे :

'' सृष्टवस्तुविज्ञाना ( Natural History )-चा आपल्या जीवनांत काय उपयोग, असा प्रश्न विचारल्यास मी उत्तर देईन कीं, आपल्या जीवनांतील प्रत्येक गोष्टीचें व्यापारी पद्धतीनें मूल्यमापन झालेंच पाहिजे काय ? असें कांहीं असूंच शकणार नाहीं का, कीं ज्याला व्यावहारिक मूल्य नसतांहि तें परमार्थानें आपल्या जीवनांत स्थान प्राप्त करून घेतें ?— आत्मसंतोषासाठीं, ज्ञानपिपासेच्या तृप्तीसाठीं, कांहीं नाहीं तरी एखाद्या क्षणापुरतें आपल्या रसदृष्टीला संतोष देण्यासाठीं तरी कांहींच नसतें काय ?

'' मला स्वतःला अशा अभ्यासामुळें शांतता लाभली आहे. त्याचा परिणाम असा झाला आहे कीं, माझ्या आसपास पसरलेल्या जगाकडे, जड म्हटल्या जाणाऱ्या पण अणुपरमाणूंतून चैतन्यानें व्याप्त झालेल्या जगाकडे मी नव्या दृष्टीनें पाहूं लागलों आहे. माझ्या पायदळीं तुडवली जाणारी माती मला त्रासदायक व पाय घाण करणारी जड वस्तु वाटत नाहीं. तिचा विचार करूं लागलों म्हणजे माझ्या दृष्टीपुढून तिचें आजचें स्वरूप विरून जातें व माझ्या मनश्चक्षूंसमोर कोट्यवधि वर्षांपूर्वी गुजरातच्या या भूमीच्या जागीं असलेल्या उत्तरखंड आणि गोंडवा यांच्या भूमीच्या मध्यें सीमारूपानें असलेल्या त्या काळच्या पृथ्वीच्या कटिमेखलेसारख्या शोभणाऱ्या भूमध्य समुद्राचें पाणी खळबळ करतांना व उसळतांना दिसूं लागतें. त्याच्या उदरांत युरोपापासून भारतापर्यंत विस्तारलेल्या अशा एकाच वंशांतील मेषशृंगी, भल्लेदेही वगैरे जलचर माझ्या नजरेसमोर येतात. त्या काळीं हिमालय नव्हता. पण पुराणयोगी 'आरा-मल' पर्वताच्या शाखा मध्य-आशियापर्यंत पसरलेल्या होत्या. आजहि हिमालय याच आरामलाच्या भूगर्भांत विस्तार पावलेल्या एका शाखेच्या मांडीवर विराजमान झालेला आहे, हें कदाचित् आपल्या लक्षांत आलेलें नसेल. माझ्या विषादाच्या क्षणीं, माझ्या



अनुक्रमणिका






व्यथित मनोदशेच्या वेळीं मला दिलासा देणारें सृष्टि-निरीक्षण हेंच आहे...माझ्या नजरेला खिडक्यांचीं दारें, कपाटें, खुर्च्या, बांकें वगैरे वस्तू जड वाटत नाहींत, तर तेथें सजीव वृक्षांचीं रूपें मला दिसूं लागतात. ही केवळ अतिशयोक्ति नाहीं, कीं मनोराज्यहि नाहीं ! ' विरहीव विभो प्रियामयं परिपश्यामि भवन्मयं जगत् । '

" स्व. जयकृष्णभाई वनस्पतींच्या प्रेमांत तल्लीन होऊन वनस्पतींबरोबर गोष्टी बोलत, प्रेमार्द्र भावानें आंसवें ढाळीत आणि उन्मत्त पुरूरव्याप्रमाणें त्यांना मिठी मारीत. हा सहानुभूतीचा परिणाम आहे. काव्याच्या वाचनाप्रमाणें प्राणी वगैरेंच्या अवलोकनांत मानसिक श्रम करावे न लागतां त्यांच्या देहाची ललित शोभा आपण आपल्या स्थूल दृष्टीनें पाहूं शकतों. त्यांच्या गानांतील माधुर्य, संगीताचें यत्किंचित् ज्ञान नसतांहि, आपण अनुभवूं शकतों.

" या क्षेत्रांत आपणाला विनासायास जें निर्मळ विद्याव्यासंगाचें अधिष्ठान प्राप्त होतें तें अन्य कोठेंहि मिळूं शकणार नाहीं. इतर विज्ञानक्षेत्रांएवढी साधन-सामग्रीचीहि आवश्यकता येथें नसते. आपले डोळे व कान हीं आपलीं साधनें, आणि आपल्या आसपास पसरलेली सजीव-निर्जीव सृष्टि ही आपली प्रयोगशाळा. अशा पृथक् पुरुषार्थाच्या योगेंच जगांतील प्राणिविषयक, वनस्पतिविषयक आणि भूविद्याविषयक इतिहास लिहिला गेला आहे. हीं तिन्ही शास्त्रें केवळ निरीक्षणावर अवलंबून राहणारीं आहेत. प्रयोगशाळेंत त्यांचा नामकरणविधि वगैरे होईल, पण त्यांचा आविष्कार मात्र सृष्टीच्या कुशींतच निरीक्षणद्वारें करतां येतो. जगाच्या कोनाकोपऱ्यांत वसलेल्या इंग्रज प्रजाजनांनीं गोळा करून पाठविलेल्या अशा भेटींतूनच ब्रिटिश म्यूझिअम, क्यू गार्डन्स् आणि झूऑलॉजिकल सोसायटी यांचीं विश्वविख्यात संग्रहालयें निर्माण झालीं. अशाच प्रयत्नांमुळें जर्मनी, फ्रान्स वगैरे देशांतील प्राणि-वनस्पति-संग्रह अस्तित्वांत आले आहेत. या पद्धतीचेंच अनुकरण करून आपण आपल्या गुजरातेंतील प्राणि-वनस्पति-संग्रह सहज निर्माण करूं शकूं. तें आपलें कर्तव्य व धर्म आहे. आपण आपलें काम केलें नाहीं तर दुसरें कोण करणार आहे ? स्वार्थवश असूनहि थोडेंफार करून दाखविणारे इंग्रज आतां येथें नाहींत; अशा स्थितींत आपण कर्तव्यभ्रष्ट झालों तर भावी जनतेचा आपण मोठा द्रोहच केल्यासारखें होईल."

## " पाऊस, पाऊस "

हिंदुस्तान हा देश शेतकीप्रधान, पावसावर अवलंबून राहणारा. पावसाचा लहरीपणा हा आपणा सर्वांच्या अत्यंत परिचयाचा आहे. निसर्गावरील हें अवलंबन फारच जाचक वाटूं लागलें आहे.

या लहरीपणावर इलाज म्हणून कृत्रिम पर्जन्य पाडण्याचा उपाय आधुनिक विज्ञानानें काढण्याचा प्रयत्न चालविला आहे. अमेरिकेंत अशा तऱ्हेनें शास्त्रीय उपकरणांच्या मदतीनें निसर्गांतून जी कमतरता असेल ती भरून काढून किंवा जीं कारणें ढगांतून पाऊस पडूं देत नसतील तीं दूर करून, वरवर हिंडणाऱ्या ढगांतून मुसळधार पाऊस पाडावयाचा उपक्रम झालेला होता व त्याला व्यावहारिक यशहि येत होतें. म्हणजे अमेरिकेंत ही केवळ प्रयोगशाळेंतील घटना न राहतां प्रत्यक्ष उघड्या मळ्यांवर किंवा शेतांवर अनेक मैलांच्या विस्तारांत पाऊस पाडतां येऊं लागला आहे व तो विशेषसा महागहि पडत नाहीं. असें म्हणतात कीं नवानगरच्या जामसाहेबांनीं या नवीन संशोधनाचा प्रयोग करून पाहावयाचा विचार केला होता.

या कृत्रिम पावसाबद्दलची मनोरंजक माहिती ' रीडर्स् डायजेस्ट ' च्या ( जुलैच्या अंकांत ) संकलित करून दिलेली आहे. लेव्हरेट जी. रिचर्ड्स् यांच्या एका लेखाचा सारांश देऊन या शास्त्रीय साधनांनीं पाडल्या जाणाऱ्या पावसाची विविध माहिती त्यांत दिलेली खालीं संक्षिप्त केली आहे :

अमेरिकेंत व जवळच्या अटलांटिकमधील मोठमोठ्या बेटांत अनेक वेळां हे पाऊस पाडण्याचे प्रयोग झाले. या सर्वांत न्यू मेक्सिको या अमेरिकेच्या परगण्यांतील प्रयोगांनीं सर्वांचें लक्ष तिकडे वेधलें ( २१ जुलै १९४९ ). या प्रयोगाचें तंत्र पहिल्या वेळीं पुढीप्रमाणें होतें : या प्रांतांतील अल्बुकर्क नजीकच्या वाळवंटांत शास्त्रज्ञांनीं एक फवारे उडविणाऱ्या टोंकाचा "स्प्रे-नॉझल" बर्नर उभा केला. सूर्योदयानंतर थोड्याच वेळांत त्यांनीं या



अनुक्रमणिका








बर्नरमध्यें जळणाऱ्या हायड्रोजन ज्योतींत सिल्व्हर आयोडाइड धरण्यास सुरवात केली. २५०० °F अंशाच्या उष्णतामानानें याची ( सूक्ष्मदर्शकांतूनहि क्वचितच दिसूं शकेल अशी Sub-Microscopic स्फटिकमय ) वाफ बनली आणि ती अभ्ररहित आकाशांतून ताशीं १० मैल वेगाच्या वाऱ्याच्या लहरींवरून वाहिली जाऊं लागली. २५ मैलांवरील मॅन्झानो पर्वतावर ती वाफ २–२॥ तासांत पोहोंचेल असा शास्त्रज्ञांनीं अंदाज केलेला होता. ८–३० वाजायच्या सुमारास त्या पर्वताच्या बाजूंवर एक मोठ्या राशीच्या आकाराचा ( Cumulus ) मेघ दृग्गोचर होऊं लागला. त्यानंतर १॥ तासानें विजा चमकूं लागल्या आणि मुसळधार पावसाचा वर्षाव झाला. हा सबंध काळ हायड्रोजन ज्योतीवरून निघालेल्या सिल्व्हर आयोडाइडच्या कोट्यवधि केन्द्रवर्ती कणांनीं ( Nuclei ) सर्व हवा भरून टाकलेली होती.

सूक्ष्मदर्शक यंत्राखालीं बर्फाच्या कणांसारखे वाटणारे सिल्व्हर आयोडाइडचे सूक्ष्म पिंगट स्फटिकमय कण पावसाचे बिंदू तयार व्हावयास लागणारे केन्द्रवर्ती कण म्हणून अगदीं आदर्श ठरले. ह्या केन्द्रवर्ती कणांच्या अभावामुळें बहुतेक वेळां हे ढग जमूनहि पाऊस मात्र पडत नाहीं व ते तसेच विखरून जातात. ढग फार उंच गेले कीं पाण्याचे बिंदू ( या कणांव्यतिरिक्तहि ) हिमांकाहून ( ' फ्रीझिंग ' बिंदूहून ) खालच्या अंशांवरील उष्णतामानावर जातात. पण ते गोठत मात्र नाहींत. अशा थंड झालेल्या जलबिंदूंत वरील द्रव्याचे सूक्ष्म कण मिसळतांच तेथें बर्फाचे स्फटिक तयार होतात. शेजारच्या जलबिंदूंशीं यांचा संबंध येतांच त्यांचे बर्फाचे तुकडे बनतात व नंतर त्यांचे लहान लहान कण होऊन सबंध ढगांत ते पसरतात. या स्फटिकीकरणाच्या क्रियेंतून उष्णता मोकळी सुटते व त्यामुळेंच हीं ' चेन रिॲक्शन ' ( शृंखलारूप प्रतिक्रिया ) घडतांना मोठमोठ्या गर्जनांचे स्फोट होतात. जमिनीवर पाऊस पाण्याच्या रूपांत पडतो कीं बर्फ पडतें तें उष्णतामानावर अवलंबून असतें. उष्ण हवेंतून बर्फ खालीं येतांना वितळून पाणी बनतें.

मोलोकाई नांवाच्या ' हवाई ' द्वीपसमूहांतील बेटांत ' ड्राय आईस ' नामक द्रव्याच्या साह्यानें पाऊस पाडण्यांत आला होता (१३ जून १९४९). तसाच १० जानेवारी १९४९ ला लानाई नांवाच्या लहानशा बेटावरहि पाऊस पाडण्यांत आला होता. वरील मोलोकाई बेटावरील पावसाच्या पूर्वीं, १०० पौंड ' ड्राय आईस ' एका विमानांतून सर्व विस्तारभर पसरून टाकलेलें होतें. हें ' ड्राय आईस ' ( शुष्क बर्फ ) म्हणजे शून्य अंशाखालील १०९° अंश उष्णतामानाचा कार्बन-डायऑक्साइड होय. या ' शुष्क बर्फा ' मुळें होणारी क्रिया भिन्न आहे. ढगांतील जलबिंदू ज्या नीच उष्णतामानावर गोठतात त्याहूनहि खालीं म्हणजे शून्य अंशाखालीं ३८ अंशाइतकें उष्णतामान ' शुष्क बर्फा 'मुळें होतें. अशा प्रकारें त्या अति गोठलेल्या हिमबिंदूंतूनच अवश्य ते केंद्रवर्ती कण ( Nuclei ) प्राप्त होतात. हें ' शुष्क बर्फ ' ३२ किंवा त्याहून खालच्या अंशांवरील उष्णतामानावर उपयोगी असतें. पण सिल्व्हर आयोडाईड मात्र १४ अंशांवरहि पूर्ण उपयुक्त ठरतें. डॉ. व्हिन्सेन्ट जे. शेफर यांनीं १९४८ सालीं दोन्हीं द्रव्यें वापरून पाहिलीं होतीं. बोस्टनचा प्रयोगकर्ता हेर्मान कोहेन हा अशा रासायनिक द्रव्यांत कांहीं ठराविक रंग घालतो म्हणजे पर्जन्यमापक नळींत जमलेल्या पाण्यांत ते रंग दिसतात. या रंगदार पावसाला ' कोहेनचा पाऊस ' म्हणतात. परंतु वरील दोन्हीं द्रव्यें उपयोगांत आणावयास ढग अति थंड ( super-cooled ) असावे लागतात. विषुववृत्तानजीक, उष्ण-कटिबंधांत किंवा अर्धोष्ण-कटिबंधांत हें अशक्य असतें. अमेरिकेंतहि हें हिवाळ्यांवांचून सर्वच संस्थानांतून शक्य असत नाहीं. उष्ण ढगावरहि क्रिया घडविणारें एक नवीन गुप्त द्रव्य " मूलद्रव्य क्ष " ( Element X ) हें आहे. गारांच्या वर्षावावर ताबा मिळविण्यासाठीं याचा उपयोग अगदीं आश्चर्यकारक झाला आहे व तसेंच तें गाढ धुकें व खालीं येणारे ढग यांवरहि उपयोगी ठरेल असें वाटतें.

दक्षिण ओरेगॉनमधील ' रोग रिव्हर ' दरींतील पिकांतील अर्धें पीक दरवर्षीं गारांच्या वर्षावानें नाश पावत असे, पण १९४९ च्या उन्हाळ्यांत







आजूबाजूच्या उंच टेंकड्यांवर जरी गारांचे वर्षाव झाले तरी मधल्या दरींतील पिकांवर मात्र एकहि गार पडली नाहीं. ही घटना म्हणजे निसर्गाची एक लहरहि असूं शकेल. पण 'रोग रिव्हर व्हॅली ट्रॅफिक ॲसोशिएशन'चे सभासद शेतकरी मात्र तुम्हांला सांगतील कीं हें काम हावें ट्रेन्डो व यूजेन कूझर या दोन माजी आरमारी वैमानिकांनीं आपल्या 'एलीमेन्ट X' च्या द्वारें फत्ते करून दाखविलें. आजूबाजूला गारांचा खच पडूं लागतांच हे दोन वैमानिक आपल्या विमानांतून १६,००० व १८,००० फूट उंच गेले आणि त्यांनीं त्या गारांच्या ढगांवर आपल्या "मूलद्रव्य क्ष"चा मारा केला आणि 'क्यूम्यूलो-निम्बस' म्हणजे राशीराशींच्या पर्जन्ययुक्त ढगांत विद्युत्पात व गारा यांस योग्य ती परिस्थिति उत्पन्न होण्याआधींच ती थोपविली. या नवीन द्रव्यामुळें ढगांतील बिंदू गोठण्यापूर्वींच परस्परांकडे आकृष्ट होतात व गारा होण्यापूर्वींच पावसाच्या रूपानें पडतात.

या नवीन शोधांमुळें अवर्षणामुळें होणारे हाल आणि गारांमुळें होणारी हानि थांबणें संभवनीय झालें आहे.

## "प्राचीन भारतांतील परराष्ट्रीय वकिलाती"

रामायण—महाभारतकालांतील भारतांत आजच्या स्वरूपाच्या वकिलातींचा संभव फारच कमी असणार. त्या वेळच्या आपल्या राष्ट्राच्या स्वरूपांतच फरक होता. अंतर्गत लहानलहान राष्ट्रें हीं स्वतंत्र राज्यें होतीं व त्यांच्यामधील तंट्याच्या वेळीं "शिष्टाई" करण्यासाठीं एक पक्ष विरुद्ध पक्षाकडे एखाद्या सन्मान्य व्यक्तीला पाठवी. अशा तऱ्हेच्या शिष्टाईची कृष्णशिष्टाई किंवा अंगदशिष्टाई हीं उदाहरणें फार प्रसिद्ध आहेत. परंतु श्री. रत्नचन्द्र अग्रवाल यांनीं "मॉडर्न रिव्ह्यू"च्या मेच्या अंकांत या विषयावरील वरील मथळ्याचा जो लेख लिहिला आहे त्यांत त्यांनीं कृष्णाच्या व अंगदाच्या किंवा हनुमंताच्या 'दूत'स्वरूपांतील फरक सूचित केला आहे. कृष्णाला त्या प्रश्नाबाबत तडजोड करण्याची संपूर्ण मोकळीक दिलेली होती. अंगदाचें कार्य त्या मानानें फारच मर्यादित होतें, आणि मारुतीचें तर केवळ निरोप्या 'दूता'चें व हेराचें काम होतें.

ह्या आर्षकालानंतरच्या ऐतिहासिक कालांतील भारताचे संबंध बाहेरच्या प्रगत जगाशीं अधिक आले. त्या वेळीं समुद्रयान किंवा परदेशगमन हें तितकें निषिद्ध राहिलें नसावें. श्री. रत्नचन्द्र अग्रवाल यांनीं भारताचे ग्रीकांबरोबर, चिनी लोकांबरोबर व रोमन राजवटीबरोबर कसे परराष्ट्रीय संबंध होते व ते सुरळीत राहण्यासाठीं त्या वेळेस कोणत्या वकिलाती होत्या याची जी माहिती या लेखांत दिली आहे त्यावरून हे संबंध त्या काळच्या मानानें मोठ्या प्रमाणावर होते, हें दाखविलें आहे.

ऐतिहासिक कालांतील पहिल्या परराष्ट्रीय राजकीय संबंधाचें उदाहरण आपणास सम्राट् चंद्रगुप्त मौर्याच्या राजवटींत मिळतें. सेल्युकस निकेटरचा पराभव झाल्यावर त्या ग्रीक सुभेदारानें मेगॅस्थेनीसला मौर्यदरबारीं पाठविलें. चंद्रगुप्ताचा पुत्र बिंदुसार यानेंहि ग्रीक राजा अन्टिओक्लुस सोटर यानें पाठविलेला राजदूत डाईमस्कॉस याची दरबारांत योग्य संभावना केली आणि हिंदी सम्राटाच्या विनंतीवरून त्या ग्रीक राजानें कांहीं अंजीर आणि मनुकांचें मद्य ( raisin wine ) हीं पाठविलीं. बिंदुसाराला हीं फार आवडत.

बेसनगरच्या लोहस्तंभावरील लेखामुळें आणखी एका अशा राजकीय संबंधावर प्रकाश पडला आहे. तक्षशिलेचा सुभेदार हेलिओडोरस (Heliodorus) हा ग्रीक राजा ॲन्टिआल्किडस याच्यातर्फे मध्यभारतांतील राजा भगभद्र याच्या दरबारीं वकील होता. हिंदुधर्म व तत्त्वज्ञान यांचा या वकिलाच्या मनावर इतका परिणाम घडला कीं, तो विष्णूचा महान् पूजक बनला आणि त्यानें विष्णूच्या भक्तीचें निदर्शक म्हणून तो स्तम्भ उभा केला. हा बेसनगरचा लोहस्तंभ व लेख जी. आय. पी. रेल्वेच्या भिलसा स्टेशनपासून दोन मैलांवरील एका खेडेगांवाजवळ आहे.

अशोकाच्या काळीं तर, या परराष्ट्रीय वकिलातींना फार महत्त्व आलें होतें. या महान् सम्राटाचे वकील मॅसीडोनचा अन्टिगोनस, उत्तर आफ्रिकेचा मागास्, एपिरुसचा अलेक्झान्डर, ईजिप्तचा टॉलेमी, फिलान्डेलाफोस आणि सीरियाचा दुसरा ॲन्टिओकस

यांच्या दरबारीं प्रामुख्यानें होते. परराष्ट्रांत धर्मप्रचार करावयास अशोक जीं माणसें पाठवी तींहि महत्त्वाचीं असत. त्यानें आपल्या मुलांमुलींनाहि यांतून वगळलें नव्हतें. त्यानें आपल्या महेन्द्र व संघमित्रा या मुलांना सीलोनमध्यें बुद्धाचा उपदेश समजावून देण्यास पाठविलें. त्यांच्या उपदेशानें सीलोनी प्रजेच्या जीवनाची घडण बदलली ती अनेक शतकें तशीच घडत गेली.

चीनशीं भारताचे परराष्ट्रीय संबंध पुरातन कालापासून ११ व्या शतकापर्यंत चालू होते. पहिला भारतीय प्रतिनिधि, चिनी सम्राट् 'हो–ती' (इ. स. ८९–१०५) याच्या कारकीर्दींत, चीनला पोंचला. राजा 'वे इ' (Wei) याच्या विनंतीवरून मगध सम्राटानें परमार्थ नांवाच्या प्रसिद्ध पंडिताला अशा एका राजकीय प्रतिनिधिमंडळाबरोबर चीनला पाठविलें. अर्थात् गुप्तांच्या समृद्धीच्या कालांत या परराष्ट्रीय संबंधाची परिसीमा झाली होती. 'वे इ' वंशाच्या दुसऱ्या एका सम्राटानें सुंग युन याला इ. स. ५१८ मध्यें भारतांत पाठविलें. त्यानें परत जातांना हिंदुस्थानांतून १७० बौद्ध ग्रंथ बरोबर नेले. कनोजच्या हर्ष-राजानें इ. स. च्या ७ व्या शतकांत एका चिनी प्रतिनिधिमंडळाला भेट दिली होती. वॉंग–हिऊएन यानें तर या संबंधांत हिंदुस्थानाला तीन फेऱ्या घातल्या होत्या. या राजकीय वकिलाव्यतिरिक्त अनेक प्रवासीहि भगवान् बुद्धाच्या अवशेषांचें दर्शन घ्यावयास येत. यांपैकीं फाहियान, इत्सिंग व हिऊएन–त्संग हे प्रसिद्ध आहेत. इ. स. ७९५ मध्यें ओरिसाचा राजा शुभकर यानें आपल्या दरबारी ग्रंथालयांतून 'गंडव्यूह' (Gandavyuha) नामक ग्रंथाची सचित्र हस्तलिखित प्रत चीनला नेण्यासाठीं एक खास प्रतिनिधिमंडळ पाठविलें होतें.

रोमबरोबर भारताचे संबंध खिस्तपूर्व पहिल्या शतकाच्या प्रथमार्धांत सुरू झाले होते. कांहीं इतिहासकारांच्या मतें अशीं भारतीय प्रतिनिधींचीं मंडळें चार तरी गेलीं असावींत. यांपैकीं एका मंडळाबरोबर एक हिंदी तत्त्वज्ञ निघाला होता; पण त्यानें अथेन्समध्यें स्वतःला जाळून आत्महत्या केली. दमास्कसच्या निकोलस नांवाच्या, प्रत्यक्ष हजर असलेल्या, गृहस्थाच्या मतें या भारतीय मंडळांना रोमला पोंचण्यास चार-चार वर्षें लागत. तेव्हांपासून राजकीय किंवा व्यापारी निमित्तानें अशीं मंडळें उभयराष्ट्रांतून जाऊं–येऊं लागलीं. भारतांतील सुखोपभोगाच्या वस्तूंची रोमन लोकांना फार आवड होती. त्या काळीं रोमन सम्राटाला हिंदी मालाच्या मोबदल्यांत पांच कोटी सेस्टर्स नाणीं (दशलक्ष पौंड) मोजावीं लागलीं. ट्रजन (इ. स. ९८–११७), हेड्रिअन (११७–१३८), ॲन्टोनीअस पायस (१३८–१६१), हेलीओगाबीस (२१८–२२२), ऑरेलिअन (२७०–२७३) कॉन्स्टन्टाईन (३२३ – ३२५), ज्यूलिअन (३६१–३६३) हे भारताशीं असे राजकीय संबंध ठेवण्याबाबत प्रसिद्ध होते. पांडीचरीजवळ आर्केमेडू येथें अलीकडे सांपडलेलीं रोमन नाणीं आपला रोमन साम्राज्याशीं कसा काय संबंध होता यावर चांगलाच प्रकाश पाडतात. इतरत्रहि अशीं नाणीं मिळालेलीं आहेतच.

इराणचा राजा खुश्रू यानें पाठविलेल्या वकिलाला भारतांतील महान् चालुक्यसम्राट् पुलकेशी भेट देत असल्याचें चित्र अजन्टा येथील रंगचित्रांत उपलब्ध आहे. ताबारी नांवाच्या अरबी इतिहासकाराच्या मतें खुश्रूनेंहि अशीच एका हिंदी वकीलमंडळाला भेट दिली होती.

सुमात्रा–जावा यांसारख्या भारतीय छायेखालीं असलेल्या पौरस्त्य देशांतूनहि असे दूत येत. सुमात्राचा राजा बलिपुत्र देव यानें पाठविलेला वकील बंगालचा राजा देवपाल देव याच्या दरबारीं आलेला होता. सुमात्राच्या राजदूतानें या वेळीं नालन्दाच्या विद्यापीठासाठीं पांच गांवांचें इनाम जाहीर केलें होतें.

भारतांत मुस्लिम राजसत्ता सुरू झाल्यावर मात्र ही प्रथा बंद पडली.

## रशियन रंगभूमि

कांहीं लोकांचा असा समज आहे कीं सोव्हिएट रशिया म्हणजे शास्त्रीय शोधांत गुंतलेला, पंचवार्षिक योजना आंखण्यांत गढलेला व नवनवीन नगरें व विमानादि अद्ययावत् साधनांचे कारखाने







उभारणारा मुख्यतः रूक्ष स्वरूपाचा देश आहे, आणि म्हणून जीवनांत लज्जत उत्पन्न करणाऱ्या, चतन्य संचरविणाऱ्या कला-काव्यादि गोष्टींना तेथें क्वचित्‌च वाव मिळत असेल. तथापि हा समज खरा नाहीं. कला, संगीत वाङ्मय व रंगभूमि यांची रशियांत चांगल्या प्रकारें भरभराट होत चालली आहे. एवढेंच नव्हे, तर क्रांतिपूर्वकाळीं यांचा उपभोग घेण्याची संधि ज्यांना बिलकुल मिळत नव्हती अशा सामान्य जनतेंतहि यासंबंधींची आवड व्यापक प्रमाणांत फैलावली आहे.

जुन्या रशियापेक्षां आजच्या रशियांत रंगभूमीला खूप विविधता आली असून तिच्यांत नवचैतन्य कसें संचरलें आहे, याची कल्पना आपणांस मॉरिस डॉब यांच्या U.S.S.R.:Her life and her people या पुस्तकावरून येतें. पूर्वीच्या काळीं रंगभूमि ही मोठाल्या शहरांतील मूठभर सुखवस्तु वर्गाची मिरास होऊन बसली होती. बहुजनसमाजाला रंगभूमीचें दर्शन फार करून कधीं लाभलेंच नाहीं. पण आज पूर्वीच्या निदान पांच-सहा पट तरी नाटकगृहें आहेत. एकट्या मॉस्को शहरांतच चाळीस नाटकगृहें आहेत. पूर्वी तेथें अवघीं सात-आठच फार तर असतील.

निरनिराळ्या चाळीस भाषिक विभागांतील अल्पसंख्याकांच्या सोयीसाठीं खास चाळीस नाटकगृहें आहेत; पण त्यांतल्या त्यांत मॉस्को, लेनिनग्राड व कीव्ह या ठिकाणांच्या रंगभूमीला युरोपांतील दुसऱ्या कोणत्याहि शहरांत तोड नाहीं. आणि या नाटकगृहांतून बहुजनसमाजाची नेहमीं खूप गर्दी होत असते. या नाटकगृहांतील 'बॉक्स' मधील जागा किंवा 'स्टॉल्स' मधील रांगांच्या रांगा विशिष्ट कारखान्यांतील कामगारांसाठीं राखून ठेवल्या जातात. अमुक एका कारखान्यासाठीं किंवा कामगार यूनियनसाठीं अमुक जागा राखून ठेवल्याची सूचक पाटी बाहेर लावून ठेवलेली असते.

उन्हाळ्यांत मॉस्को-लेनिनग्राडसारख्या मोठमोठ्या नाटकगृहांतल्या नाटकमंडळ्या छोट्या छोट्या शहरांतून, सामुदायिक शेतमळ्यांवर, मजुर-क्लबांत वगैरे दौरा काढतात; युद्धकालांत रणांगणावर आघाडीवरील सैनिकांची व आरमारांतील नौदलाची करमणूक करतात. मोठमोठे कारखाने व सामुदायिक शेतमळ्यांचीं गांवें यांतून नाटक क्लब स्थापन केलेले असतात. या क्लबांना शहरी नाटकमंडळ्या वेळोवेळीं सल्ला देऊन कधीं कधीं गरजेनुसार नटनटी धाडून सर्व प्रकारें साहाय्य करतात. कांहीं शहरांत कामगार–यूनियन्सची स्वतःचीं नाटकगृहें असतात. लाल सेनेचींहि नाटकगृहें असतात.

रशियांतील नाटकगृहांचें वैशिष्ट्य असें कीं त्यांत सामान्यतः एक नाट्यशाला असते. तेथें नटांना शिक्षण दिलें जातें. निरनिराळ्या नाटकगृहांच्या वेगवेगळ्या पद्धती व कलात्मक कौशल्याचा उच्च दर्जा यांना कारणीभूत या नाट्यशालाच होत.

राष्ट्रीय नाटकगृहें हीं सर्वांत अधिक महत्त्वाचीं आहेत. शिक्षणखात्याच्या प्रभुत्वाखालीं व खर्चानें ह्यांचें कार्य चालतें. पण एवढें असलें तरी आपापल्या पद्धती व कलावंत यांची निवड करण्याचें प्रत्येकाला बरेंचसें स्वातंत्र्य असतें.

सध्यांच्या रशियन रंगभूमीवर मुख्यत्वेंकरून आजकालच्या रशियन लेखकांचीं नाटकेंच बहुशः होतात. क्रांतीनंतरच्या लगेचच्या काळांत क्रांतीतील कांहीं प्रसंगांवर आधारलेलीं नाटकेंच प्रामुख्यानें होत; तशींच सध्यां, आजकालच्या एकंदर सोव्हिएट जीवनाच्या विविध अंगांचें व समस्यांचें चित्रण करणारीं नाटकें होत असतात. बंधनांतून मुक्त होऊन स्वातंत्र्यांत पदार्पण केलेल्या आजच्या नव्या सोव्हिएट स्त्री-पुरुषांचें जीवन, त्या नवजीवनांतील आनंददायी वातावरण व नवचैतन्य हेंच बहुतेक सर्व नाटकांतील विषयसूत्र असतें. तसेंच नवसाम्यवादी जगाची उभारणी करतांना पुढें उभ्या रहाणाऱ्या विविध समस्या कशा उकलावयाच्या हें दाखवून देण्याचा अभ्यासपूर्वक प्रयत्नहि करण्यांत आलेला असतो.

परंतु ह्याबरोबरच, जुन्या रशियन लेखकांच्या व इतर देशांतील लेखकांच्या अभिजात नाट्यकलाकृतीसुद्धां अतिशय लोकप्रिय झालेल्या आहेत.







लोकांना या कलाकृती आवडतात; याचें कारण असें कीं, जी महान् मानवी संस्कृति नव्या पिढीला आत्मसात् करावयाची आहे, तिचा थोडा-फार वारसा या कलाकृतीपासून आपणाला मिळतो असें त्यांना वाटतें. लंडनमध्यें होत नसतील इतके शेक्सपिअरच्या नाटकांचे प्रयोग मॉस्कोमध्यें होत असतात, हें लक्षांत घेण्यासारखें आहे. मोलिअेर, गोल्डोनी, कॅल्डेरॉन, बेन जॉन्सन व शेरिडन, ॲरि-स्टॉफेनीस, एस्कायलस, सरव्हँटीस, शिलर, गोएते, व्हिक्टर ह्युगो, किंवा अगदीं अलीकडील युजेन ओ'नील, सीन ओफसी आणि बर्नार्ड शॉ आदीकरून अनेकविध लेखकांच्या अभिजात नाटकांचे प्रयोग रशियन रंगभूमीवर होत असतात.

सन १९४१–४२ च्या हिंवाळ्यांत मॉस्को व लेनिनग्राडच्या वेशीवर तुंबळ युद्ध जुंपलें असतां, त्या वेळच्या वोल्गा नदीवरील कुइबायशेव या युद्ध-कालीन राजधानींत उत्साही प्रेक्षकांना ऑलिव्हर गोल्डस्मिथच्या 'शी स्टूप्स टु काँकर' या नाट-काचा प्रयोग करून दाखविण्यांत येत होता; तर टिफ्लिस येथील जॉर्जिअन रुस्तावेली नाटकगृहांत 'हॅम्लेट' चा प्रयोग चालला होता.

रशियन नाटकगृहें अद्ययावत्, भव्य व सुसज्ज अशीं आहेत. कांहीं ठिकाणीं तर फिरती रंगभूमि असल्यानें एक प्रवेश चालू असतां पुढील एकदोन प्रवेशांची सीनसीनरी आधीं सजावट करून ठेवून देतां येते. या सोयीमुळें वेळाची खूप बचत होते. प्रवेशपालट किंवा अंकपालट होते त्या वेळीं वेळ वायां जात नाहीं. भव्य नाटकगृहांतून दाखविण्यांत येणारे भव्य सजावटीचे देखावे उभे करून रंगभूमीचें नांव खरोखरी सार्थ करून दाखविणें, या फिरत्या रंग-भूमीच्या सोयीनें अधिक सुलभ झालें आहे.

—पंढरिनाथ रेगे

## संताल परगण्यांतील लोकसाहित्य

कलकत्त्याच्या उत्तरेस सुमारें १५० मैलांच्या अंतरावर ४८०० चौ. मैलाचा संताल परगणा आहे. तेथील लोक मुंडा जातीचे आदिवासी आहेत. यांच्या विषयींच्या कांहीं लोककथा श्री. योगींद्र जग-न्नाथ त्रिपाठी एम्. ए. यांनीं गुजराती "शारदा" मासिकाच्या जुलैच्या अंकांत संग्रहीत केल्या आहेत. त्यांतून कांहीं सामान्य माहिती व एक लोककथा पुढें दिली आहे :

"संतालचे मुंडा लोक पंचमहालांतील भिल्लां-प्रमाणेंच जंगली आणि मांसाहारी आहेत. ते स्वभावा-नें भोळे, शूर, लढाऊ आणि आनंदी असतात. ते टोळ्याटोळ्यांनीं राहतात. प्रत्येक गांवाच्यांत एक मुख्य असतो आणि दुसरा एक प्रभावशाली पुरुष गांवांतील तरुण स्त्री-पुरुषांच्या नैतिक जीवनाकडे लक्ष देत असतो. याशिवाय एक धर्मोपदेशक व एक जमादार असतो. जमादाराचें काम गांवांत चालणारे गुन्हे पकडणें हें असतें. कित्येक गांवांचा एक परगणा बनलेला असतो व त्या परगण्याचा अधिकारी सर्व कारभार चालवतो.

"या लोकांचा धर्म म्हणजे प्रेतधर्म. आपल्या पिढींत होऊन गेलेल्या पुरुषांचीं प्रेतें, वनांतील प्रेतसमूह, पर्वतदऱ्यांतून राहणारीं भूतप्रेतें हीं सर्व या रानटी लोकांची आराध्य दैवतें असतात; आणि त्यांचा पूजाविधि म्हणजे सणावारीं मोठे उत्सव करायचे, या भूतप्रेतांपुढें बळी द्यायचे, नाचगाणीं करावयाचीं आणि तांदुळांतून तयार केलेलें एक प्रकारचें मद्य प्यावयाचें असा असतो.

"संताल लोकांच्या अनेक प्रकारच्या लोक-कथा आहेत. कांहींत बुद्धिचातुर्य असतें तर कांहींत नीतिविषयक ज्ञान, कांहींत व्यवहारकौशल्य आणि कांहीं कथांत माणसांच्या किंवा प्राण्यांच्या विशिष्ट गुणांचें रसात्मक दिग्दर्शन व शेवटीं भूतप्रेतादिकां-विषयींचें जिवंत अनुभव—असें सर्व कांहीं आढळतें. सोमदेवाच्या 'कथासरित्सागरा'प्रमाणेंच ह्या लोककथा लोकांना नीति, व्यवहार, मानवी जीवन यांविषयीं व समाजजीवनाच्या विविध अंतांविषयीं माहिती देण्यास फारच उपयोगी आहेत.

पुढील लोककथा कुटुंबांतील सगोत्र विवाहाच्या इष्टानिष्टतेसंबंधीं आहे :

"एका कुटुंबांत सात भाऊ व एक बहीण. सहा भाऊ लग्न झालेले, धाकटा अविवाहित. या सातव्या भावाला मुलगी मिळेना. त्याचें नांव कोरा होतें.

शेवटीं तो जंगलांत गेला आणि एक जंगली फुलझाडाचें रोप उपटून आणून त्यानें आपल्या दारीं लावलें. त्यानें असें जाहीर केलें कीं या झाडाला येणाऱ्या फुलांतील एखादें फूल कोणी मुलीनें खुडून आपल्या केसांत घातल्यास ती माझी बायको होईल.

" त्या फुलझाडाला एक फूल धरलें. मोठें छान होतें. लोक तें पाहात. कोराहि तें न्याहाळी. कोराच्या बहिणीला तें खूप आवडलें; तिचें त्यावर मन बसलें. आईचें सांगणें न ऐकतांच तिनें तें खुडून केसांत अडकवलें. पण मग पुढचें भविष्य लक्षांत घेऊन तिनें तें काढून फेंकून दिलें. सगळे चूप बसले.

" कोरानें पाहिलें तों फूल खुडलेलें. आईला विचारतां तिनें कानावर हात ठेवले. पण फुलावर केस गुंतलेले होते. त्यानें ते दाखवतांच आईनें घडलेली हकिकत त्याला सांगितली. बापानेंहि म्हटलें कीं, दैवानेंच या भावाबहिणींचें लग्न करायचें ठरवलेलें दिसतें. पण बहिणीला फार दुःख झालें. ती आपल्या आवडत्या पोपटाला बरोबर घेऊन जंगलांत पळून गेली. तेथें एका झाडावर लपून राहिली. पोपट तिला फळें आणून देई. तीं खाऊन ती राही. एके दिवशीं एक बुरडाची मुलगी बांबूच्या टोपल्या, पंखे विकावयाला चालली होती. ती या झाडाखालीं विसाव्याला थांबली. वरून कोराच्या बहिणीनें तिला पाहिलें व हांक मारून म्हटलें : 'अग, मला एक पंखा दे. मी तुला माझा बाजुबंद देते.' तिनें वरून बाजुबंद टाकला व हिनें खालून पंखा फेकला. मग कोराची बहीण म्हणाली : ' हा बाजुबंद कोणाला दाखवूं नको. नाहींतर जीवावर बेतेल. ' ती मुलगी गांवांत गेली, पण बाजुबंद घातलेला हात कपड्यानें झांकून गेली. लोकांनीं विचारलें : 'कां ग, हात झांकलास ?' ती म्हणते, ' हाताला व्रण झाला आहे. ' लोक म्हणाले ' दाखव पाहूं ! ' शेवटीं तिचें कांहीं न चालून तिनें हात उघडा केला, तों आंत बाजुबंद. कोरानें तो ओळखला. तो म्हणाला : 'अग, हा कोणी दिला तुला ? तो माझ्या बहिणीचा आहे. तें ठिकाण दाखविलेंस, तर टोपला भरून चांगले तांदूळ देईन.' तिनें तें झाड दाखविलें. पण बहीण घरीं येण्यास तयार झाली नाहीं. शेवटीं त्यांनीं इंद्राची प्रार्थना केली कीं मोठें वादळ उत्पन्न कर म्हणजे ही पोरगी घरीं येईलच. वादळ उठलें. सर्व रान पाण्यानें भरलें, झाडें मोडलीं. रात्र पडली तशी बिचारी एकटी बहीण काय करणार ? ती घरीं आली. बाहेर धकोटीच्या पडवीचें दार कोरानें मुद्दामच उघडें ठेवलें होतें. त्यांतून ती आंत आली. आंत कोरा निजलेला ! त्याला पाहून तिला फार दुःख झालें. जें नशिबांत होतें तें टाळण्यासाठीं गेलों पण तें टळत नाहीं, म्हणून ती वैतागली. थोडी ऊब मिळतांच कोराच्या जवळ जाऊन निजली आणि तिनें तीक्ष्ण धारेच्या पात्यानें आपला गळा कापून घेतला.

" कोरा जागा झाला आणि पाहतो तों शेजारीं निजलेल्या बहिणीचा गळा कापलेला व रक्त वाहिलेलें ! त्यानें आपलाहि गळा तसाच कापून घेऊन तिच्या शेजारीं मृत होऊन तो पडला. पण त्याचें रक्त बहिणीच्या रक्ताच्या विरुद्ध दिशेला वाहात गेलें. तें लोकांना दिसतांच त्यांनीं ठरविलें कीं, या पुढें भावाबहिणींचीं लग्नें निषिद्ध आहेत. तेव्हां पासून संताल लोकांत असें लग्न होत नाहीं. "

## अमेरिकेंतील युवकांचे ' प्रवासी विहार '

अमेरिकेंत सुटीच्या दिवसांत प्रवासाला जाणाऱ्या युवकांसाठीं वाटेंत टिकटिकाणीं ' प्रवासी विहार ' ( हॉस्टेल्स ) असतात. तसें पाहिलें तर सुटीच्या दिवसांतील प्रवासाची ही व्यवस्था अमेरिकेंत नवीनच आहे, पण ती झपाट्यानें लोकप्रिय होत आहे. या वर्षीं अंदाजें २०,००० अमेरिकन लोक ( ही संख्या गतवर्षींच्या दुप्पट आहे ) प्रवासाला जातील, आणि अमेरिका, हवाई, अलास्का, मेक्सिको, ग्वाटेमाला, कॅनडा, ब्रिटिश बेटें, यूरोप आणि आफ्रिका येथील विहारांचा फायदा घेतील.

ही प्रवासी मंडळी कधीं पायीं, कधीं घोड्यावरून , कधीं दुचाकीवरून, कधीं हिमपादुका ( स्की ) बांधून, तर कधीं होडक्यांत बसून मजल मारतात. त्यांतल्या त्यांत पायीं हिंडत जाण्याचा किंवा दुचाकीवरून जाण्याचा प्रघात फारच लोकप्रिय आहे. " अमेरिकन यूथ हॉस्टेल असोसिएशन " ( अमेरिकन युवकांचें ' प्रवासी विहार '–मंडळ )



अनुक्रमणिका

या नांवांची एक संस्था अमेरिकेंत आहे. या मंडळानें ठिकठिकाणीं चालविलेल्या वसतिस्थानां-(हॉस्टेल किंवा विहार) मधून प्रवासी मंडळी रात्रींचा मुक्काम करतात. या विहारांचें स्वरूप अमुकच प्रकारचें असतें असें सांगतां येणार नाहीं. शेतावरील झोपड्या, तात्पुरत्या छपऱ्या, खाजगी घरें, धान्याचीं रिकामीं कोठारें, शाळांच्या इमारती, किंवा जुनीं लष्करी वसतिस्थानें, यांपैकीं कशाचाहि उपयोग विहारांसाठीं करतात.

ज्यांना बाहेरच्या मोकळ्या जीवनाची आवड आहे आणि ज्यांना फारशा खटाटोपाशिवाय, खर्चाशिवाय, जग पाहाण्याची इच्छा आहे, अशा लोकांना "प्रवासी विहार" फार सोयीचे असतात. "प्रवासी विहारां"त मुक्काम करीत करीत मजल दरमजल हिंडणाऱ्या युवकांच्या आनंदी मनःस्थितीचें उत्तम वर्णन अमेरिकन कवि वॉल्ट व्हिट्मन याच्या पुढील काव्यपंक्तींत सांपडतें :

"Afoot and light-hearted
I take to the open road
Healthy, free, the world before me.
The long brown path before me
leading wherever I choose."

या काव्यपंक्तींत कवि म्हणतो : "मी पायीं पायीं जात आहें. या खुल्या मार्गानें मी स्वच्छंदपणें चाललों आहें. हें निरामय, अनिर्बंध जग माझ्या समोर पसरलेलें आहे. मला वाटेल तेथें या लांबच लांब वाटेनें मला जातां येईल."

ही प्रवासी मंडळी दिवसाला १० ते १५ मैल पायीं रपेट करतात किंवा दुचाकीनें २० ते ३० मैल जातात. त्यांच्या बरोबर अगदीं कमींत कमी सामान असतें. दिवस मावळेपर्यंत ते एखाद्या विहाराला जाऊन पोंचतात. त्या विहारांत स्वच्छ अंथरूण, पांघरूण, आणि स्वयंपाकाचीं भांडीं त्यांच्यासाठीं तयार असतात आणि त्या सामानासाठीं एका रात्रीचें फक्त अडीच रुपये भाडें द्यावें लागतें.

१९३४ मध्यें इझाबेल आणि मन्रो स्मिथ या नांवाच्या एका अमेरिकन जोडप्यानें विहारांची कल्पना युरोपांतून अमेरिकेंत आणली. अमेरिकेंतील मॅसॅच्युसेट्स् या पूर्वेकडील राज्यांत, नॉर्थफील्ड गांवीं, पहिला "प्रवासी विहार" (हॉस्टेल) उघडला गेला. जर्मनींतील आल्टेनाचा रिचर्ड शिर्मन यानें ५० वर्षांमागें जर्मनींत विहारांची चळवळ सुरू केली, म्हणून त्याचें नांव नॉर्थफील्डच्या पहिल्या "प्रवासी विहारा"ला दिलें गेलें.

अमेरिकेंतील ४८ राज्यांपैकीं २९ राज्यांत सध्यां ११२ "प्रवासी विहार" आहेत. त्या शिवाय, मंजुरी मिळालेलीं अशी ४० वसतिस्थानें आहेत. हे विहार एकमेकांपासून सुमारें १५ मैलांच्या अंतरावर गटागटानें असतात. खूप लांबवर रपेट करीत जातां यावें हा विहारांचा हेतु नसून सृष्टिनिरीक्षण करतां यावें हा हेतु असतो. विहारांतील प्रवासी युवक-युवती सरोवरांत पोहतात. ताजें दूध पिण्यासाठीं एखाद्या गौळवाड्यांत थांबतात. एखाद्या पर्वतराजीच्या सौंदर्याचें निरीक्षण करतात. किंवा एखाद्या ओढ्याच्या कांठीं आराम घेतात.

"अमेरिकन यूथ हॉस्टेल्स" ही अमेरिकेंतील एक राष्ट्रीय संघटना आहे. या संघटनेमार्फत तरुण-तरुणींसाठीं दौऱ्याचे कार्यक्रम आंखले जातात. या वर्षीं या संघटनेनें ३५ ते ५६ दिवसांच्या मुदतीचे ९ निरनिराळे प्रादेशिक "विहारां"चे दौरे ठरविले आहेत. एक दौरा उत्तर न्यू इंग्लंडचा आहे. दुसरा दौरा वॉशिंग्टन राजधानीच्या आसपास आहे. पेन्सिल्व्हानिया राज्यांत "विहारां"च्या दौऱ्यावर घोड्यावरून जाण्याची सोय आहे. आणखी एका दौऱ्यांत मिशिगन विश्वविद्यालय आणि "ग्रेट लेक्स" चा प्रदेश पाहाण्यास मिळतो. कॅनडांतील "रॉकी" पर्वतांची प्रेक्षणीय भव्यता एका दौऱ्यांत पाहातां येते. दुसऱ्या एका दौऱ्यांत कॅनडाच्या फ्रेंच-भाषी विभागांतील सौंदर्यस्थळांना भेट देतां येते. त्या भागांतील मच्छीमार गांवें आणि चमत्कारिक चालीरीती पाहून "जुन्या जगा"ची आठवण येते.

अमेरिकेंत न्यू यॉर्क शहरापासून सॅन-फ्रान्सिस्को-पर्यंत ३,००० मैलांचा "विहारां"चा प्रवास करावयाचा असल्यास, २०० "विहारां" ची जरूर लागेल आणि सर्वसाधारण तरुण प्रवाशाला इतका मोकळा वेळहि मिळणार नाहीं. म्हणून








" अमेरिकन यूथ हॉस्टेल्स " संघटनेनें "चक्रगति" दौऱ्यांची योजना ठरविली आहे. या योजनेप्रमाणें खास सुसज्ज केलेल्या बीज-गाड्यांतून " विहारा "-चे दौरे काढतात. जेथें सृष्टिसौंदर्याचीं किंवा ऐतिहासिक महत्त्वाचीं स्थळें असतील तेथें त्या गाड्यांत थांबतात आणि नंतर प्रवासी मंडळी पायीं किंवा दुचाकीवरून प्रेक्षणीय स्थळें पाहाण्यास जातात. त्या गाड्यांत झोंपण्याची सोय असते, कपडे धुण्याची व्यवस्था असते, स्वयंपाकघरें असतात आणि विशेष गोष्ट ही कीं रात्रीच्या वेळीं त्या गाड्यांचा उपयोग " विहारा " सारखा करतां येतो.

अमेरिकेंतील या " प्रवासी विहारा "च्या दौऱ्यांत इतर देशांतील प्रवाश्यांना भाग घेतां येतो. दुसऱ्या देशांतील " विहारां " चा परवाना अमेरिकेंतील कोणत्याहि " विहारां ' त चालतो.

उत्तर "अमेरिकन" विहारांत जाऊन आलेल्या युरोपियन लोकांच्या मतें युरोपांतील " विहारां "-पेक्षां अमेरिकेंतील " विहार " अधिक मागसलेले असतात. पण अगदीं आवश्यक वस्तूंचीच सोय करून अडचणीच्या परिस्थितींत प्रवास करणें पुष्कळ अमेरिकन शौकीनांना आवडतें.

जॉन डी. रॉकफेलर ( तिसरे ), त्याच आडनांवाच्या सुप्रसिद्ध अमेरिकन दानशूराचे नातू, हे " अमेरिकन यूथ हॉस्टेल्स " संघटनेचे अध्यक्ष आहेत. त्यांचें असें मत आहे कीं, ' विहार ' पद्धतीच्या प्रवासानें तरुण मंडळीची धाडसाची इच्छा तृप्त होते, आणि त्या प्रवासामुळें त्यांची विचार-शक्ति वाढून त्यांच्यांतून उत्तम प्रकारचे नागरिक व पुढारी निर्माण होतात.

ते म्हणतात : " भोंवतालच्य परिस्थितीचा तोच-तोचपणा तरुण मंडळींना आवडत नाहीं. त्यांना बदल हवा असतो. नवीन लोकांच्या ओळखी करून घेणें आणि नवीन स्थळें पाहाणें ही जी तीव्र इच्छा तरुण मनांत असते, तिच्या प्रभावी प्रेरणेनेंच अमेरिकेची निर्मिति झाली आहे. त्याच इच्छेच्या प्रभावानें विविध वंश व परंपरा एकत्र होऊन अमेरिकेचें एक अखंड एकसंध राष्ट्र निर्माण झालें आहे."

अमेरिकेचे एके काळचे अध्यक्ष फ्रँकलिन डी. रूझवेल्ट यांना " विहारां " ची कल्पना फारच आवडत असे. ते म्हणत : " ' विहारा ' ची योजना मला लहानपणापासूनच परिचित आहे; आणि तिचें महत्त्व मला पटलेलें आहे. देशाटन केल्यानें मनुष्य अधिक चांगला नागरिक होतो. केवळ स्वतःच्या देशाचाच नव्हे तर जगाचा नागरिक होण्याची पात्रता त्याच्या अंगीं येते."

—( ' अमेरिकन जीवन ' यु. स्टे. इ. स. )

---

## जितकें सत्य मोठें, तितकी नम्रता अधिक

हिंसामय जगांत अहिंसामय होऊन जगावयाचें आहे. हें सत्यावर दृढ राहूनच होऊं शकतें. या मुळेंच मी सत्यांतून अहिंसा सिद्ध करूं शकतों. सत्यांतून प्रेम मिळतें, सत्यांतून मृदुता मिळतें. सत्यवादी सत्याग्रह्यानें फार नम्र व्हायला हवें. जितकें मोठें सत्य तितकाच तो नम्र होत जाईल. याचा मला प्रतिक्षणीं अनुभव मिळत आहे. मला यावेळीं सत्याचा जितका विचार पडतो तो वर्षभरापूर्वीं पडत नसे व या वेळीं मला माझी अल्पज्ञता जितकी जाणवते ती वर्षभरापूर्वीं जाणवत नसे.

शरीराची स्थिति अहंकारामुळेंच संभवते. शरीराचा आत्यंतिक नाश म्हणजेच मोक्ष. अहंकाराचा आत्यंतिक नाश ज्याच्यांत झाला, तो सत्याची मूर्ति बनला. त्याला ब्रह्म म्हटलें तरी चालेल. यामुळें ईश्वराचें सर्वांत सुंदर नांव दासानुदास आहे.

स्त्री, पुत्र, मित्र, परिग्रह सर्व कांहीं या सत्याच्या स्वाधीन असावें. सत्याचा शोध घेतांना या सर्वांचा त्याग करण्यासाठीं जो सज्ज झाला तोच सत्याग्रही बनला. या धर्माचें पालन कांहीं अशीं सहज व्हावें या हेतूनें मी या राजकारणांत पडलों आहे, आणि तुमच्यासारख्यांचें बलिदान करण्यासहि मागेंपुढें पाहात नाहीं. त्याच सत्याचें बाह्यरूप ' हिंद स्वराज्य ' आहे. त्याचें खरें स्वरूप प्रत्येक व्यक्तीचें स्वराज्य आहे.

—म. गांधी ( १७–३–२२ रोजीं जमनालालजींना लिहिलेल्या एका पत्रांतून. )

Regd. No. B. 5177






